


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)






महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

चित्रकार दीनानाथ दलाल ह्यांनी सन १९४७ ते १९७१ दरम्यान प्रसिद्ध केलेल्या दीपावली ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीय स्वरूपात जतन करण्याबाबतचा प्रस्ताव चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे राज्य मराठी विकास संस्थेस प्राप्त झाला होता. सदर प्रस्तावानुसार दुर्मिळ मराठी ग्रंथांचे संगणकीकरण ह्या प्रकल्पांतर्गत दीपावली नियतकालिकांचे अंक संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सहमती दर्शविण्यात आली.

चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला ही सामग्री संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका








अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट




## श्रेयनामावलि—



● **रंगीत चित्रभेट : जगन्नाथ**-कविता कामिनीचा आत्मविश्वास ● 'काळाशींहि घनयुद्ध करूं !! मग चिन्यांचा काय कथा !! -**दि. वि. गोखले** ● कोणे एके काळीं-**रणजित देसाई** ● स्वामी विवेकानंद-**सदानंद चेंदवणकर** ● एकाहून एक नग आहेत नग-**जयवंत दळवी** ● वाढवी महत्त्व वडिलांचें-**पद्माकर गोवईकर** ● 'द्रोणा, तूं मधांत घोळलेली सुरी आहेस-**आत्माराम नीलकंठ** ● चौरंग-**दत्ता कदम** ● ध्रुव ढळला-**कमांडर जेम्स** अनु: **श्रीकृष्ण ठाकूर** ● कपट-**सौ. सुमन वागळे** ● ख्वजा-**वि. म. कुळकर्णी** ● नामदेव आणि कुत्रा-**वामन प्रभु**.

### सदरें:—

● **युद्धस्यकथा** ● **पानपूरकें** ● **दीपमाला** ● **व्यंगचित्रें, बिंगचित्रें**
● **स. न. वि. वि. इ. इ.**

*संपादक-मुद्रक-प्रकाशक-मालक-श्री. **दीनानाथ दलाल**. दलाल आर्ट स्टुडिओ, ४०-४२ केनेडी ब्रिज, मुंबई ४-या प्रतीस किंमत रु. १ अधिक रजिस्टर पोष्ट ५० न. पैसे. वार्षिक वर्गणी दिवाळी अंकासह रु. १२॥. या अंकांत प्रसिद्ध झालेलीं मतें हीं चालकांचीहि अधिकृत मतें असतात असें नाहीं. 

दलाल आर्ट स्टुडिओ. ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४

जानेवारी १९६३ • वर्ष १८ वें •

टेलिफोन नं. ७७७६१
Gram.: DALALART

# दीपावली

## दलाल आर्ट स्टूडियो

४२, केनेडी ब्रीज, मुंबई ४.

टेलिफोनः ७७७६५  तारेचा पत्ता : DALALART

● **वर्गणीदारांस सूचना** : दीपावली व सर्व खास अंकांसह दीपावलीची वार्षिक वर्गणी रु. १२–५० न. पै., द्वैवार्षिक वर्गणी रु. २०; त्रैवार्षिक वर्गणी रु. २५ व चार वर्षांची वर्गणी रु. ३२. **परदेशी वार्षिक वर्गणी रु. १६–००**

● **वर्गणी** मनिऑर्डरनें यावी. चेक पाठविल्यास तो दलाल आर्ट स्टूडियोच्या नांवें, मुंबई बँकेवरचा असावा. इतर ठिकाणच्या बँकेवरचा असल्यास ७५ न. पै वटणावळ ज़ादा पाठवावी. कोणत्याहि महिन्यापासून वर्गणीदार होता येतें.

● **अंक न पोचल्याचें** कळवावयाचें झाल्यास ५ तारखेपर्यंत वाट पाहून मग कळवावें. अंक ऑफीसमध्यें शिल्लक असल्यास जरूर पाठविला जाईल.

● **जाहिरातींचा व्यवहार** हा परस्पर विश्वासाचा असतो. गिऱ्हाइकाच्या इच्छेनुसार जाहिरात छापण्याची कोशिस करण्यांत येते. तरीहि तांत्रिक अडचणीमुळें अगर अन्य कारणामुळें जाहिरातींत कमीजास्त फरक झाला तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकांवर नाहीं.

● **साहित्याच्या स्वीकृतीचा** निर्णय महिनाभरांत सामान्यतः कळविला जातो. **पोस्टेज असलेलें** नापसंत साहित्य परत पाठविलें जातें. पुरेसें पोस्टेज नसल्यास तें **निकालांत** काढलें जाईल.

● **स्वीकृत अगर इतर साहित्य** गहाळ झालें तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकांवर नाहीं.

संपादक, मालक, मुद्रक व प्रकाशक श्री. **दीनानाथ** दलाल यांनीं आवाज प्रिंटर्स, मोदी चेंबर्स, फ्रेंच ब्रीज, मुंबई ४ येथें छापून, दलाल आर्ट स्टूडिओ, ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४ येथें प्रसिद्ध केलें.





संपादक, 'दीपावली' यांसः—

दीपावलीचा वार्षिकांक पहिल्या पानापासून शेवटच्या पानापर्यंत वाचून मगच हें पत्र लिहीत आहे. गेलीं अठरा वर्षें मी आपल्या वार्षिकाचा निष्ठावंत वाचक आहे. 'दीपावली' म्हणजे आमच्या दिवाळीच्या संकल्पित खरेदींतील एक आवश्यक बाब असते; परंतु ही एकच वस्तु अशी आहे कीं, तिच्या बाबतींत केलेल्या खर्चाच्या मानानें, मोजतां येणार नाहीं इतक्या मोठ्या प्रमाणांत–फायदा आपल्या पदरांत पडतो.

तुमच्या अंकांतली प्रत्येक गोष्ट आधीं ठरवून केल्यासारखी वाटते. त्यामुळें पानन् पान पहातांना मोठा आनंद होतो. 'आलं तसं भरून काढलं' अशी एकहि जागा दिसत नाहीं. सजावटीच्या बाबतींत तर इतर कोणताहि दिवाळी अंक तुमच्या पासंगाला पुरत नाहीं. त्या दृष्टीनें 'दीपावली'नें एक परंपराच निर्माण केलेली आहे.

या वर्षीच्या तुमच्या दिवाळी अंकांत अरविंद गोखले आणि पु. ल. देशपांडे यांचें लेखन मला अधिक आवडलें. आणि आमच्या कुटुंबाला सौ. शिरीष पै यांची गोष्ट सर्वांत चांगली वाटली. बाकीच्यांना मनोहर तल्हार यांची 'शाप' ही गोष्ट आवडली.

या वर्षीच्या रंगीत चित्रांत 'सुनीत' व 'गीतरामायण' हीं दोन्हीं चित्रें मला आवडलीं.

उत्तरोत्तर आपली भरभराट होईल आणि दरवर्षी आमच्यासारख्या वाचकांचे दुवे आपण घेत रहाल अशी इच्छा बाळगतो.

आपला,
**मनोहर के. प्रधान**
शिवाजी पार्क, मुंबई.

संपादक, महाशय—

श्री. आनंद साधले यांचे 'परीहरि हा ब्रह्मचारी' ह्या मथळ्याखालीं श्रीकृष्णाच्या ब्रम्हचर्याबद्दल, 'दीपावली' मासिकाच्या सप्टेंबर, ऑक्टोबर व डिसेंबर अंकांतील ३ लेख माझ्या वाचनांत आले व श्री. साधलेंचे डिसेंबर १९६१ च्या अंकांत वरील विषयावरील लिखाण समाप्त झालें.

प्रथमच लेखकानें हा प्रश्न बुद्धिवादानें समाजापुढें मांडला ह्याबद्दल मी त्यांचें आभार मानतो परंतु पुढें त्यांचा लिखाणावरील तोल हळूहळू जाऊन अखेर डिसेंबरच्या अंकांत शेवटीं शेवटीं त्यांनीं आपलें मत प्रतिपादन करण्यासाठीं श्रीकृष्णाबद्दल केलेलीं विधानें वाचून तो तोल संपूर्ण नाहींसा झाला, तो कसा गेला हें ओघाओघानें पुढें येईलच. असो.

श्रीकृष्ण कोण हें कोणालाच माहीत नाहीं. हें मी म्हणत नाहीं; तर तो विभूतियोगांत स्वतःच म्हणतो, 'नमे विदुःसुरगणा प्रभवं न महर्षय.' बरें हें न पटणारें म्हणावें तर लेखकांच्या लिखाणाप्रमाणें जगांत गीतेच्या ज्ञानाशिवाय दुसरें कोणतें ज्ञान नांदते–अर्थात नाहीं. मग लेखकाला श्रीकृष्ण कोण हें कळलें कसें? श्रीकृष्णाच्या देहधर्माचा म्हणजेच रासक्रीडेचा त्यांनीं हा जो बादंग वाढविला, ह्याला कारण ते श्रीकृष्णाला आपल्यासारखा मनुष्य (जीव) समजले म्हणूनच. परंतु त्याचेंही उत्तर श्रीकृष्णानें देऊन ठेविलेंच आहे. तें असे :– 'अवजानंति मां मुढा मानुषीं तनुमाश्रितमं' म्हणजे जगाच्या कल्याणासाठीं मनुष्यदेह धारण करणारा जो मी त्या माझी अवज्ञा करितात. म्हणून मी पुन्हां म्हणतो कीं लेखकाला श्रीकृष्ण कोण हें कळलेंच नाहीं.

**समर्थांनीं म्हटलेंच आहे कीं:—**

जैसे जयास भासले। तैसे तेणे कवित्व केले॥
परंतु निवडिले पाहिजे। प्रचीतीचें॥ म्हणजे ज्याला जसें वाटलें तसें त्यानें त्याच्याबद्दल लिहिलें परंतु शहाण्यानें प्रचीतीला येईल तें घ्यावें येथपर्यंत येऊन ते थांबले असते तर त्यांचा बोज तरी राहिला असता परंतु दुर्दैवानें तो ह्यापुढें तसा राहिला नाहीं, तो कसा गेला ते पहा—

लेखक म्हणतात त्याचप्रमाणें श्रीकृष्ण चरित्र मुख्यतः महाभारत, हरिवंश व भागवत ह्या तीन ग्रंथांतून पहावयास मिळतें ह्यांत

दुमत नाहीं. त्यांत श्रीकृष्णाबद्दल कालानुसार म्हणजे प्रसंगोचित म्हणजे बालपण, तारुण्य इ. बद्दल त्रोटक माहिती का होईना असू शकेल परंतु तो श्रीकृष्णाच्यावेळचा इतिहास आहे हें नाकबूल करता येत नाहीं. बरें, तें नाकबूल करावें तर तेच ग्रंथ आपणास आज असें विचारतील कीं, कांहो साधले-कंसाला मारतांना श्रीकृष्णाचें वय किती होतें तर जवळपास १२ व ह्या वयांत कृष्ण कंसाला कसा काय मारूं शकतो? कंसाला मारला हें सत्य व तोहि श्रीकृष्णानें मारला हेंहि सत्य. तलवारीनें मारलें म्हणावें तर-बुद्धिवादानें अगदीं बुद्धिवादानें पहा-तलवारीची उंची तलवार चालविणाऱ्या इतकीच, वजन तलवारीचें म्हणा अगर तलवार बहाद्दुराचें म्हणा म्हणजे १२ वर्षांच्या मुलाचें म्हणा-तर वार करतांना परस्परांना न पेलण्याइतके. वार करणाऱ्या १२ वर्षांच्या मुलाच्या हाताचा पंजा केवढा असू शकेल? शेवटीं ज्या कंसावर वार करावयाचा तो तर कृष्णाच्या घातासाठीं किती तत्पर होता. कंस राजा होता. त्यालाहि तलवार चांगलीच चालविता येत होती. देहानेंहि तो अजस्र होता. मग हें घडलें कसें? इतकें असूनहि कंस वधाबद्दल इतिहास एकसूत्री आहे. बरें, कंसाची मान पकडून अगर त्याचे केस पकडून त्याच्या मानेवर श्रीकृष्णानें १२ व्या वर्षी वार केला म्हणावें तर तेंहि शक्य नाहीं; कारण त्याची उंची आड येते. बारावर्षांच्या मुलाच्या हाताच्या पंजांत कंस ह्या राक्षसाची मान माऊंच शकत नाहीं. कंस तर अद्वितीय योद्धा होता. पुन्हां एकदा बुद्धिवादानें याचा विचार करा. अशीं अनेक उदाहरणें देतां येतील.

सारांश काय-तर वरील विधान जर सत्य तर रासक्रीडा कांहो असत्य?

**आतां श्रीकृष्णाचें बालपणः**-साधले म्हणतात, 'कृष्ण अशा भटक्या व अशिष्ट समाजांत रहात होता-त्याच्या शिक्षणाची सांदिपनींकडे नीट व्यवस्था लागली. या शिक्षणाच्या संस्कारांतून मूळच्या दगडाची (कृष्ण दगड काय?) एक सुंदर मूर्ति बनली इत्यादी इ. साधले ह्यानांहि श्रीकृष्णानें उत्तर देऊन ठेविलेंच आहे. मात्र आपण जरा तसदी घेऊन गी. अध्याय ७, श्लोक ६ व ७ वाचावे, त्यांत तो म्हणतो-' जगाचा उत्पत्तिकर्ता व संहारकर्ता मी श्रीकृष्ण न माझ्याहून श्रेष्ठ दुसरें असें कांहीं नाहीं ' हें वाचल्यावर साधले तुमच्या लिखाणाबद्दल ' मुलगा वडिलांच्या बारशाला हजर होता ' असें म्हणावें लागतें. इतकें ऐकल्याधर साधलेंनीं श्रीचक्रधर व महानुभाव पंथाबद्दल काढलेल्या उद्गाराबद्दल त्यांना सूत्रपाठांत आपोआप उत्तर मिळतें. फरक इतकाच कीं गीता संस्कृतांत व सूत्रपाठ मराठींत. अर्थ एक, सारांश एक.

**श्रीकृष्णाचें सांदिपनीकडे शिक्षणः**- सांदिपनीकडे कृष्ण काय शिकला ह्या उलट पहा. कृष्णकृपेनें सांदिप्नीनीं काय मिळविलें. सांदिपनीकडे श्रीकृष्णास कांहीं शिकण्यासारखें असतें तर त्याचीं मुलें पटापट मरत होती. शेवटीं त्याला संतान नव्हतेंच. तेव्हां श्रीकृष्णानें त्याचीं मुलें जिवंत करून दिलीं. त्यावेळीं तो श्रीकृष्णास म्हणतो, " कृष्णा तूं पूर्णब्रह्म असतांना मी मानव तुला काय शिकवूं ' (हरिविजय अ. २०) श्रीकृष्ण तर तेथें फक्त ६४ दिवसच होता व ह्या २ महिने ४ दिवसांत १४ विद्या ६४ कला शिकून श्रीकृष्ण सुंदर मूर्ति बनला काय? पण हें बुद्धीला पटत नाहीं. ह्यावरून एवढें मात्र लक्षांत येतें, कीं जेवढा ज्याचा त्याच्याशीं ऋणानुबंध होता तितकाच वेळ तो त्यांच्याजवळ राहिला.

विचार करा, सांदिपनीकडे ही संजीवनी विद्या असती तर त्यानें जवळपास एक तप पुत्रशोक खासच सहन केला नसता. आतां मद्यपानानें ही विद्या नाहींशी होतें म्हणावें तर सांदिपनीनें तसें काहीं केलें नव्हतें व इतिहासहि तसें सांगत नाहीं. मग श्रीकृष्णाकडे संजीवनी विद्या आश्रमांत असतानांच आली कोठून? ह्यानंतर अवतारकार्य संपेपर्यंत श्रीकृष्णानें दुसरा आश्रम पाहिला नाहीं. बरें श्रीकृष्णाला अवगत असलेल्या सर्व विद्या सांदिपनीकडे होत्या म्हणावें तर तसेंही नाहीं. जेव्हां आश्रमांत श्रीकृष्ण, बलराम व सुदामा हे शिक्षणासाठीं राहिले तेव्हां सांदिपनीनें सर्वांनाच सारखें शिक्षण दिलें, तर मग श्रीकृष्णाचा भाऊ बलराम ह्याला ब्रह्मविद्या माहीत नव्हती. मल्लविद्या, धनुर्विद्या, युद्धाचे धडे बलरामानें सांदिपनीकडून न घेतां दुसऱ्याकडून कां घ्यावें? मग पाठीला पोट लागलेल्या सुदाम्याबद्दल विचारणें नकोच. थोडक्यांत ह्या तिघांनीं सर्वसाधारणपणें तेथें म्हणजे गुरुगृहीं मोळ्या वाहिल्या व ह्या मोळ्या वाहून श्रीकृष्ण सुंदर मूर्ति बनला काय? तर नाहीं. निरोप घेतांना देखील हा सात्विक ब्राह्मण श्रीकृष्णास म्हणतो, ' हे सर्वज्ञान तुझेंच. तूं पूर्णब्रह्म असतांना मी मानव तुला काय शिकवूं? ' ह्या एका वाक्यानें साधलेंनी रेखाटलेलें श्रीकृष्णाचें बालपण गडगडलें व सांदिपनी तर लेखकाच्या भरंवशाचें कूळ व त्याचे हे उद्गार!

शेवटीं असेंच म्हणावें लागतें कीं, ' कृष्णभक्ति ' शिवाय कोणताही उभारलेला प्रपंच नासकाच ठरतो. असो. श्रीकृष्णार्पणमस्तु

आपला,

**द. वि. तळेकर**

**सत्यसदन, देनावाडी, ठाकुरद्वार**

●●●

**यशवंत हो! जयवंत हो!**



**तुझ्या शक्तिशाली भुजा अमोघ बलशालिनी होऊं दे!**



जगन्नाथ :

# कविता कामिनीचा आत्मविश्वास

निर्दूषणा गुणवती रसभावपूर्णा
सालंकृतिः श्रवणकोमल वर्णराजि : ॥

ज्याच्या बद्दलच्या सुरस दंतकथा इतिहास खऱ्या म्हणत नसला तरी खोट्याहि म्हणूं शकत नाहीं असा भाग्यवान संस्कृत कवि पंडितराय जगन्नाथ हा होय. हा संस्कृत भाषेंतील शेवटचा थोर कवि तुलनेनें फारच आधुनिक असून सतराव्या शतकाच्या आरंभीं होऊन गेला. अकबर, जहांगीर आणि शहाजहान या तीन मोंगल बादशहांच्या वैभवशाली कारकिर्दी त्यानें आपल्या ऐंशीं वर्षांच्या दीर्घ आयुष्यांत पाहिल्या.

तो जन्मानें आंध्र होता. वयाची बारा वर्षेंपर्यंत त्यानें मुळींच अभ्यास केला नव्हता. पुढें एकाएकीं त्याला विद्यारुची उत्पन्न होऊन तो महापंडित झाला. पुढें आपल्या विद्येचें चीज, मायभूमी आणि कर्नाटक यांत होत नाहीं असें पाहून त्यानें देशांतर केलें व जयपूरच्या दरबारांत जाऊन सन्मान मिळविला. यावेळीं अकबराचे दरबारांत एक यवन काझी होता. त्यानें वादविवाद करून हिंदु पंडितांना जिंकिलें होतें. जगन्नाथास हें कळतांच त्यानें यवनी भाषा आणि कुराण यांचा अभ्यास केला आणि मग त्या काझीस आव्हान देऊन त्याचा पराजय केला. त्याच्या कुराणांतील ज्ञानावर मोहून जाऊन गुणग्राही अकबरानें त्याला आपल्या दरबारांत मानाचें स्थान दिलें.

जगन्नाथ हा उत्तम पंडित होता तसा रसिक कवीही होता. अकबराचें त्याच्यावर मन बसलें तसे अकबराच्या अंतःपुराचें दरवाजे जगन्नाथाला खुले झाले. एकदां अकबराशीं बुद्धिबळें खेळत असतां, अकबराची लवंगी नांवाची तन्वंगी कन्या पित्यास जलपान देण्यासाठीं मस्तकावर जलकुंभ घेऊन आली तेव्हां बादशहा म्हणाला, 'कविराज, तुम्हाला हिच्यावर कविता करतां येईल काय ?' अकबराचा हा प्रश्न पूर्ण होण्याच्या आंतच जगन्नाथानें आपली कविता म्हणून दाखविली.

'ही कुसुंबी रंगाचें सुंदर वस्त्र नेसलेली तुझी सुस्तनी कन्या डोक्यावर घडा घेऊन चालली म्हणजे सर्व जगताचीं चित्तें त्या घड्यांत घालून घेऊन जाते.'

हें काव्य ऐकून बादशहा खूष झाला. त्यानें जगन्नाथास मागेल तो वर देण्याचें मान्य केलें. हा भाग्यवान क्षण हातांतून निसटून देण्याची समयसूचकता आणि धिटाई जगन्नाथाकडे होती. त्यामुळें त्यानें उत्तर दिलें,









अनुक्रमणिका

'राजा, जर देणार असशील तर मला हत्ती-घोड्यांची आकांक्षा नाहीं. द्रव्याची हौस नाहीं. ही हरिणीसारखे डोळे असलेली तुझी सुस्तनी कन्या मला दे'. जगन्नाथाची ही धिटाई बघून बादशहाला धक्का बसला. पण जगन्नाथाचें सौंदर्य, रसिकता आणि धीटपणा यामुळें लवंगीचेंच मन जगन्नाथावर गेल्याचें त्याला कळून आलें. त्यानें हा विवाह होऊं दिला आणि जगन्नाथावर वैभवाचा पाऊस पाडला.

सनातनी पंडितांना हें सहन झालें नाहीं. त्यांनीं जगन्नाथाला बहिष्कृत केलें. पण राजा आणि द्रव्य यांचा आधार असल्यानें जगन्नाथानें पंडितांना जुमानलें नाहीं. उलट पंडितांचे अग्रणी भट्टोजी दीक्षित आणि अप्पय्या दीक्षित यांच्या पांडित्याचा जाहीर अधिक्षेप केला. भट्टोजी यांच्या 'मनोरमा' या ग्रंथाचें त्यानें 'मनोरमाकुचमर्दन' या ग्रंथांत खंडन केलें. अप्पय्या यांच्या 'चित्रमीमांसा' ग्रंथाचें 'चित्रमीमांसा-खंडन' या ग्रंथांत त्यानें खंडन केलें. आपल्या स्वतःच्या पांडित्याचा निदर्शक असा 'रसगंगाधर' नांवाचा अद्वितीय साहित्यशास्त्रपर ग्रंथ त्यानें लिहिला असून तो ग्रंथ संस्कृत साहित्य शास्त्राच्या विशाल मंदिराचा कळस ठरलेला आहे.

साहित्यशास्त्रांत जागोजाग काव्याचीं उदाहरणें लागतात. सारे रस, सारे अलंकार यांचीं हीं उदाहरणें कधीही एकाच कवीच्या काव्यांत लाभत नाहींत. साहित्यशास्त्रज्ञ हीं उदाहरणें स्वतः बनविण्याच्या फंदांत तर पडत नाहींतच. कारण पांडित्य आणि कवित्व यांचें बहुदा वाकडेंच असतें. त्यामुळें हीं उदाहरणें इतरांच्या ग्रंथांतून घ्यावयाची प्रथा आहे. पण रसगंगाधर ग्रंथ लिहितांना 'मी दुसऱ्याचें एक अक्षरही घेणार नाहीं तर स्वतःचें काव्य निर्माण करीन' अशी आत्मविश्वास-पूर्ण प्रतिज्ञा जगन्नाथानें केली आहे आणि ती पार पाडली आहे. संस्कृत साहित्याच्या इतिहासांत असा पंडित कवि कविराज जगन्नाथ पंडित हाच होय.

जगन्नाथानें यवनी कांता केली तरी त्याचा पिंड हिंदूचा होता. भारतीय संस्कृतीतील आदर्शांनी त्याच्या मनाचा ताबा सोडला नव्हता. त्यामुळें गंगालहरीसारखी भक्तीनें ओथंबललीं काव्येंही तो लिहूं शकला. त्याच्या मनाची ठेवण नीट जाणण्याची कुवत नसणाऱ्या पंडितांनीं त्यानें कांतेचा त्याग केला तर त्याला शुद्ध करून घेण्याची तयारी दर्शविली. पण धर्म हा बाह्य अवडंबरापेक्षा मनाच्या धारणेवरच अवलंबून असतो असें मानणाऱ्या जगन्नाथाने पंडितांस झुगारून देऊन कांतेसच जवळ केलें. दीर्घायुष्य भोगून आतां देहत्याग करावा असें वाटलें तेव्हां त्यानें गंगेचा पूर येत असतां तिच्या घाटावर बसून आपल्या गंगालहरीचें गायन चालू केलें. जणू तान्हें वासरूं आपल्या माउलीसाठीं प्रेमानें टाहो फोडीत होतें आणि प्रेमपुरानें उसळणारी माउली हुंदारत आणि हंबरत धांवत येत होती. श्लोकामागून श्लोक संपला. पायरीपायरीनें अंतर तुटलें. माय लेकराची मिठी पडली. आणि शेवटीं जगन्नाथाला हृदयावर मिरवीत गंगामाउली आनंदो-त्फुल्ल मनानें पुढें निघून गेली.

रसगंगाधराशिवाय भामिनी विलास, गंगालहरी, सुधालहरी, करुणालहरी, अमृतलहरी इत्यादी जगन्नाथाची काव्यसंपदा आहे. गंगा-लहरी आदींमध्यें जशी त्याची उत्कट भक्ति दिसून येते तशीच भामिनी-विलासांतील त्याची उत्कट शृंगारासक्ति कालिदास जयदेव यांचें स्मरण करून देते. स्तोत्रांशिवायची त्याची सारी काव्यरचना स्फुट स्वरूपाची आहे. एकेक श्लोक हेंच एकेक काव्य. पण या श्लोकांतून जीं शब्दचित्रें उभीं रहातात तीं मनाला पूर्णपणें मोहून टाकतात. एक शब्दचित्र असें आहे,

'प्रभातेला मंगल स्नानानें शुचिर्भूत होऊन माझी लाडकी माझ्या पित्याकडे आली आणि तिनें सासऱ्यास नमस्कार केला. तेव्हां माझा पिता म्हणाला, 'पुत्रवती भव.' हे शब्द ऐकतांच ती लाजून गोरी-मोरी झाली. तिची मान खालीं गेली. बाजूलाच बसलेल्या माझ्याकडे तिनें चोरटा कटाक्ष टाकला.' इथें पिता बिचारा सरळपणें पुत्रवती भव असा आशीर्वाद देतो. पण त्या आशीर्वादानें नववधूला नुकतीच केलेली पुत्रप्राप्तीस कारण होणारी शृंगारलीला स्मरते.

दुसरें चित्र पहा. 'प्रभात झाली. आतां प्रियकराची मिठी सैला-वेल अशी तिला भीती वाटली. त्याला प्रभात झाल्याचें कळूंच नये म्हणून तिनें आपल्या कोमल करांनी त्याचे नेत्र झांकले. बिचारी! मंदमंद वहाणारा वारा कमलगंध वाहून आणीत होता आणि त्यामुळें प्रभात झाल्याचें त्यानें आधींच जाणलें होतें.'

आणि हें तिसरें चित्र. 'पहिल्या मीलनाचा दिवस. रतिसुखाच्या आनंदासाठीं कांता उत्सुक झाली होती. मध्येंच आपलें मनोगत प्रकट करण्यासाठीं ती नयनांनीच बोले तेव्हां तिचे विशाल नेत्र पूर्ण उघडत. पण त्या नयनांची भाषा वाचली गेली कीं ते लाजून पुन्हां मिटत.'

गंगेची स्तुति करतांना जगन्नाथ म्हणतो, 'रूपसुंदर नृपरमणी स्नानासाठीं गंगेंत उतरली. भीत भीत ती स्तनाएवढ्या पाण्यांत गेली. तिच्या सुडौल स्तनांना लावलेला कस्तुरीचा लेप विरघळून पाण्यांत मिस-ळला, अहाहा, त्याच क्षणीं ज्या मृगाच्या नाभींतून ती कस्तुरी काढली होती, तो मृग गंगेच्या पावन स्पर्शानें जीवन्मुक्त झाला.'

नामसुधेचें वर्णन करतांना जगन्नाथ म्हणतो, 'तूं द्राक्षारस प्यालीस. शर्करेची माधुरी सेविलीस. धारोष्ण दुधाच्या फेसानें सुखाव-लीस. कांतेच्या अधराचा चावा घेतला, तेव्हां तर अमृताची रुची तुला कळली. पण हे रसने, कृष्ण हें नाम उच्चारतांना जी गोडी लाभते ती वेगळीच नाहीं काय?'

आपलें स्वतःचें वर्णन करण्यासाठीं जणूं जगन्नाथ म्हणतो, 'मी उपनिषदें कोळून प्यालों. गीता मुखोद्गत केली. पण माझ्या मानस-सदनांतून ती विधुवदना कांहीं बाहेर जात नाहीं.'

जगन्नाथाचें काव्य शृंगारबद्दल असलें तरी त्यांत जयदेवाप्रमाणें केवळ शृंगारच नाहीं. त्याच्या प्रतिभेला इतरहि सौंदर्य दृश्यें दिसतात. एके ठिकाणीं तो म्हणतो, 'प्रभात झाली. अरविंद उमललें. मकरंदाचा गंध फैलावला. त्या मकरंदाला लोलुप असें भृंग कमलाचा उपभोग घेत मंजुगुंजन करूं लागलें. परंतु जो गंध बाहेर उधळला गेला, तो निस्पृह-पणें ज्या वायुलहरींनीं आपल्या तरल लाटेवर दशदिशांत वाहिला, त्या वायुलहरींनीच खऱ्या स्नेह्याप्रमाणें कमलाची कीर्ती पसरली.'

आणि हें दुसरें चित्र, 'ग्रीष्माचे दिवस आले. हमरस्त्यावरचा जलाशय. पान्थ त्याचें पाणी पिऊन तृप्त होऊं लागले. त्यानें तो आटूं लागला. आपण आटत आहों हें त्याला कळलें. त्याला काळजी वाटूं लागली कीं आपण आटल्यावर हे श्रान्त पान्थ कोठें बरें जातील? त्यांची तृषा कोण बरें शमवील? त्यांचा ग्रीष्मताप कोण निवारण करील? या काळजीनें त्याचे निःश्वास उष्ण उष्ण होऊं लागले. तो आणखी

...पान १४ वर

अटकेवर भगवा ध्वज
फडकला त्याचें मूळ
रोहिडेश्वराच्या
देवळांत
बाल शिवाजीनें
केलेल्या
प्रतिज्ञेंत होतें.
आपणहि आज
असेंच म्हटलें पाहिजे,
कीं —



चित्रकार : परब

# काळाशींहि घनयुद्ध करूं मग चिन्यांची काय कथा ?

कम्युनिस्ट चीन भारताच्या कुरापती गेलीं कित्येक वर्षें काढीत असला, तरी खऱ्याखुऱ्या भारत–चीन युद्धास २० ऑक्टोबर रोजीं प्रारंभ झाला. त्यानंतर आतां दोन महिन्यावर काळ लोटला आहे. या कालावधींत आपण लष्करीदृष्ट्या जमा–खर्च पाहिला, तर खर्चाच्या बाजूचें पारडें पार खालीं गेलें आहे, हें आपणास मान्य करावें लागेल.

गेल्या दोन महिन्यांत झालेलें आपल्या कमकुवतपणाचें दर्शन केवळ धक्का देणारेंच नव्हे, तर भारतासारख्या प्रचंड व नव्यानें स्वतंत्र झालेल्या देशाला निःसंशय लाजिरवाणें आहे. हा देशाचा अधिक्षेप नव्हे, ही वस्तुस्थिति आहे. या वस्तुस्थितीकडे डोळेझाक केली, तर चीन व इतिहास दोघेहि आपणांस क्षमा करणार नाहींत. यासाठीं आपल्या कमकुवतपणाचें, आपल्या गाफिलपणाचें, आपल्या चुकांचें कठोर परीक्षण करून, वेळ न गमावतां कामाला लागलें पाहिजे. थांबला तो संपला !

दि. वि. गोखले

### अक्षम्य गाफिली

चिनी हल्ला २० ऑक्टोबरला आला नि पांच दिवसांत त्यानें तावांग गाठलें. माजी संरक्षण मंत्र्यांनीं आक्रोश केला कीं, संख्या, शस्त्रें व दारूगोळा सर्व बाबतींत चिन्यांनीं आपल्यावर मात केली. असें कसें घडलें ? तिबेटमध्यें चिन्यांनीं जी जमवाजमव गेलीं कांहीं वर्षें चालविली होती, तिचा पत्ता तुम्हांला कां लागला नाहीं ! शत्रूविषयीं जास्तीतजास्त माहिती जमविणें, हा तर लष्करी शास्त्रांतला पहिला नियम आहे. गेल्या महायुद्धांत जर्मनीचें सैन्य कोठें व किती आहे, याची तपशीलवार माहिती ब्रिटन व अमेरिका अखंड गोळा करीत नि पुनः पुन्हां नानाविध मार्गांनीं तपाशीत. रशियावर स्वारी करण्यासाठीं जर्मनीनें पूर्व आघाडीवर २०० पेक्षां अधिक डिव्हिजन्स (एक डिव्हिजन म्हणजे सुमारे १५ हजार सैन्य) सैन्य जमविलें आहे. ही बातमी चर्चिल व रूझवेल्ट दोघांनींहि स्टॅलीनला दिली होती. जर्मनीनें व्ही-१ व व्ही–२ या अस्त्रांचे तळ फ्रान्समध्यें बांधायला प्रारंभ करतांच, ब्रिटननें ते तळ तर हुडकून काढलेच; पण खुद्द जर्मनींत पीनमुंडे येथें ही अतिसंहारक अस्त्रें बनविलीं जात आहेत, ही बातमी काढून त्या तळावर व कारखान्यांवर बॉंबची धार धरली.

भारताच्या सीमेवर (नेफा भागांत) येणाऱ्या चिनी सैन्याबाबतची एक वस्तुस्थिती लक्षांत घेण्याजोगी आहे. हें सर्व सैन्य एकाच मोटार रस्त्यानें आणावें लागतें. नेफापासून सुमारें २ हजार मैलांच्या चिनी प्रदेशांत रेल्वेचा फाटा नाहीं. वाटेंत असलेल्या ब्रह्मपुत्रा नदीवर अजूनहि पूल नाहीं. अशा अवस्थेंत









अनुक्रमणिका

७ ते १० हजार फूट उंचीच्या रस्त्यावरून होणारी सैन्य-वहातूक मंद गतीनें होते व सामान्य वाटसरूस सुद्धां ही हालचाल समजूं शकते. तिबेटी जनता चिनी गांजणुकीमुळें चीनविरोधी बनली आहे. तिनें आनंदानें आपल्यासाठीं हें हेरगिरीचें काम केलें असतें. त्यांचा उपयोग कृष्ण मेननी कां करून घेतला नाहीं? परदेशी वृत्तपत्रेंसुद्धां गेले कित्येक दिवस चिनी सैन्याची जमवाजमव चालूं असल्याच्या बातम्या देत होतीं. त्यांच्याकडेहि दुर्लक्ष कां करण्यांत आलें?

हाच गाफिलपणा प्रत्यक्ष नेफा विभागाबाबतहि झाला. चिनी सेनेनें अवघ्या २० दिवसांत खिंझमानें ते तावांगपर्यंतचा रस्ता, युद्ध चालूं असताहि बांधून काढला. पण भारतीय संरक्षण-खात्याला गेल्या ६ वर्षांत तो रस्ता बांधण्याची इच्छा सुद्धां झाली नाहीं. सेनाधिकाऱ्यांनीं चिनी स्वारीचे इशारे व त्या विरुद्ध घ्यायची खबरदारी, यांच्या लेखी योजना मेननना सादर केल्या होत्या. त्या कां झिडकारण्यांत आल्या? यामुळें २० ऑक्टोबरला स्वारी सुरूं होताच असें आढळून आलें कीं, सीमेवरील आपलें सैन्य चिन्यांपेक्षां संख्येनें लहान आहे, रस्त्यांच्या अभावीं त्यांच्यापाशीं पुरेसा अन्नसाठा व दारू-गोळा नाहीं; त्यांचीं शस्त्रास्त्रें जुनीपुराणीं आहेत नि त्यांचेपाशीं हिमालयाच्या हाडें फोडणाऱ्या थंडीशीं मुकाबला करूं शकतील असे उबदार कपडेसुद्धां नाहींत!

पण त्याही पलीकडे दिसून आलेली, सर्वांत मोठी उणीव म्हणजे सैन्य-दलावर मेननी लादलेलें नेतृत्व प्राप्त परिस्थितीशीं मुकाबला करण्याच्या योग्यतेचें नाहीं. येथें प्रत्यक्ष डावपेंचांचा व सेनापतींच्या निर्धाराचा संबंध येतो.

### आश्चर्यकारक माघार

चीनचा पहिला हल्ला २० ऑक्टोबर रोजीं आला–नि १० ते १५ हजार फूट उंचीच्या डोंगरांच्या रांगा ओलांडून चिनी सैन्य अवघ्या ५ दिवसांत तावांगपर्यंत येऊन थड-कलें. यावेळीं, आपली तयारी नव्हती, वाटा-घाटींचा देखावा करून चीननें विश्वासघात केला, हीं कारणें देण्यांत आलीं. पण त्यानंतर चिनी सेना पश्चिम नेफांत तावांगपाशीं व पूर्व नेफांत किबुतूपाशीं सुमारें २० दिवस थांबली होती. आघाडीवरील आपल्या सेनांना फौजेचा व अन्नाचा पुरवठा करायला हा अवधि पुरेसा होता. परदेशी शस्त्रें घ्यायचीं नाहींत, हा पंत-प्रधान नेहरूंचा पुराणा निश्चय रद्द होऊन, अँग्लो-अमेरिकन शस्त्रास्त्रेंहि आघाडीपर्यंत पोहोंचलीं होतीं. तरीहि १७ नोव्हेंबर रोजीं चीननें दुसरा हल्ला चढविल्यावर, पहिल्या खेपेचीच कॉर्बन कॉपी निघाली. से ला या भक्कम ठाण्यांतून भारतीय फौजांनीं त्वरेनें माघार घेतली. तेथून ८० मैलांवर असलेलें बोमदि ला हें मजबूत लष्करी ठाणेंहि आपल्या सेनेनें न लढवितां सोडून दिलें. ५–६ दिवसांत चिनी फौजा तावांगपासून १३० मैल धडक मारूं शकल्या. डोंगराळ प्रदेशांतील चढाईचा हा वेग खरोखरच थक्क करणारा आहे.

### खिंड कशी लढविली जाते?

से खिंड (ला या शब्दाचा अर्थ खिंड असा आहे) भारतीय फौजांनीं कां सोडली? चिनी सैन्य या खिंडीच्या बगलेवरून आलें व त्यानें से खिंडीला वेढा दिला, एवढें एकच कारण आतांपर्यंत सांगण्यांत आलें आहे. पण हें कारण पटणारें नाहीं. शत्रूच्या ठाण्याच्या बगलेवरून येऊन वेढा देणें हा लष्करी शास्त्रांतला फार प्राचीन डावपेंच आहे. असें म्हणतात कीं, से ठाण्याच्या बगलेवरून चिनी फौज आली तर आपण काय करणार, असा प्रश्न ज. कौल (नेफांतील तत्कालीन कोर कमांडर) यांना कांहीं परदेशी पत्रकारांनीं विचारलाहि होता. पण चिनी फौजेचें बगले-वरून आलेलें आगमन आपणास आधीं समजूं शकलें नाहीं, हें मान्य करूनहि हें ठाणें लगोलग सोडण्याचें कारण कळत नाहीं. एक तुलनात्मक उदाहरण दिल्यानें हा मुद्दा अधिक स्पष्ट होईल. मुंबई-पुणें रस्त्यावरील खंडा-ळ्याच्या घाटाचें चित्र डोळ्यासमोर आणा. हा घाट सुमारें १०–१२ मैल लांबीचा आहे. तो लढवायचा असेल, तर लोणावळ्यापासून कर्जतपर्यंत, घाटाच्या आजूबाजूच्या टेकड्यांवर ५–७ मैलपर्यंत पसरून फौजा ठेवल्या जातात. या फौजा खंदक, कांटेरी तारांची जाळी उभारतात. मोक्याच्या जागीं तोफा, मशिन-गन्स लावतात. सैन्याच्या केंद्र कार्यालयाशीं बिनतारीनें दळणवळण ठेवण्याची व्यवस्था असते, तसेंच परस्परांशीं टेलिफोननें वा बिन-तारीनें दळणवळण ठेवलें जातें. शत्रूनें वेढा दिला, तर दारूगोळा व अन्न कमी पडूं नये म्हणून त्याचे साठे उभारले जातात. आधुनिक काळांत अशा ठाण्यांना विमानें व हेलिकॉप्टर्स-मधून पुरवठा करणेंहि शक्य होतें.

नागडें सत्य!



बघा हो! आमची बाजू किती स्वच्छ आहे...............!





अनुक्रमणिका

### बोमदि लाहि कां सोडलें ?

से खिंड खंडाळ्याच्या घाटाच्या चौपट उंचीची आहे. तेथून परत आलेल्या सैनिकांची संख्या १० हजारांवर गेली आहे, याचाच अर्थ तेथें १५ हजारांपेक्षां अधिक फौज-फाटा होता. गेल्या महायुद्धांत गाजलेली फोर्थ इंडियन डिव्हिजन तेथें होती. या डिव्हिजनची भारतीय सेना-दलांत एवढी कीर्ति आहे कीं, तिचें सेनापतिपद मिळविण्या-साठीं सेनाधिकाऱ्यांत स्पर्धा लागे. तरीहि ही खिंड, केवळ चिनी सेना बगलेवरून आल्या म्हणून काय एका दिवसांत पडावी? से सारख्या खिंडी म्हणजे एक प्रकारें प्रबल किल्लेच. पूर्वीच्या काळीं, आजूबाजूचा प्रदेश शत्रूनें घेतला तरी महिनेंन महिने किल्ले लढत रहात. आधुनिक युद्धांतहि, आधीं संरक्षणक्षम केलेलीं ठाणीं प्रदीर्घ काल झुंझवित ठेवता येतात. सुविख्यात ब्रिटिश लष्करी टीकाकार कॅप्टन लिडेल हार्ट यांनीं आपल्या 'दि अदर साईड ऑफ दि हिल' या ग्रंथांत अशीं अनेक उदाहरणें नमूद केलीं आहेत. १९४१ सालीं नाझी फौजा मॉस्कोसमोर बर्फांत रुतून बसल्या-नंतर, रशियन फौजांनीं चढाई सुरू केली. जर्मन फौजांनीं रेल्वे जंक्शनें, शहरें मजबूत धरून ठेवली होती. रशियन फौजा या शहरांच्या बगलांवरून मागच्या प्रदेशांत जात, पण त्यांना शहरें व गांवें जिंकणें अशक्य झालें होतें. (प्रकरण-दि विंटर क्रायसिस) याच पद्धतीनें से खिंड कां लढली नाहीं? नि से खिंड सोडली तर तेथून दक्षिणेस असलेली बोमदि ला खिंड लढवायला तरी काय अडचण होती? तेजपूर या लष्करी ठाण्यापासून बोमदि लापर्यंत वहातूक-योग्य रस्ता आहे. यामुळें तेथें केव्हांहि कुमक पोहोंचविणें शक्य होतें.

भारतीय जवानांच्या शौर्याबद्दल आजपर्यंत कोणी शंका घेतलेली नाहीं नि अत्यंत प्रतिकूल परिस्थितींतहि त्यांनीं चिन्यांना असा हात दाखविला कीं, चिनीदेखील भारतीय जवानांना 'कागदी वाघ' म्हणूं शकणार नाहींत. पण सेनेच्या नेतृत्वाचा मात्र गोंधळ उडाला. कठिण समय ठेपला असतांना, 'नर्व्ह' राहिली नाहीं, हें मान्य करायलाच हवें. सुदैवानें कांहीं सेना-पतींच्या बदल्या झाल्या आहेत. पण त्याही-पलीकडे करिअप्पा, थिमय्या, थोरात, कुलवंतसिंग, श्रीनागेश अशा गेल्या युद्धांतील कसलेल्या सेनापतींना, तांत्रिक अडचणींचा बाऊ न करतां, पुन्हां सेनेचें प्रत्यक्ष नेतृत्व दिलें पाहिजे. जनतेनें तशी ठाशीव मागणी केली पाहिजे.

### फितुरांचा सुळसुळाट

हिटलरनें फितुरांचा वापर एखाद्या सेना-दलासारखा प्रभावीपणें केला होता. म्हणून फितुरीला पंचमस्तंभ हें नांव मिळालें. नेफाच्या लढाईत पंचमस्तंभीयांनीं चीनला मोठा हात दिला, हें आतां गुपित राहिलेलें नाहीं. से खिंडीच्या बगलेवरून १० हजार चिनी सैनिक आपल्या टेहेळ्या पथकांना व विमानांना पत्ता लागू न देतां आले कसे? प्रत्येक ठाण्यावर आपल्यापेक्षां अधिक संख्येनें चिनी सैन्यानें हल्ला केला, याचा अर्थ आपल्या शिबंदीची आंकडे-वारी चिन्यांच्या हातीं पडली होती काय? से लाच्या शिबंदीला माघारीचा हुकूम कोणी दिला, हें अद्याप समजलेलें नाही. बिनतारी संदेश पाठविणाऱ्या तंत्रज्ञांनीं मधल्यामधें गफलत केली काय? चिनी सैनिकांनीं म्हणे तामीळ, मल्याळम् आदि भाषांत आपल्या सैनिकांना हुकूम दिले. ठीक आहे. पण कोणतेंही सैन्य परवलीचा शब्द कानीं पडल्यावाचून कोणाचेहि हुकूम मानीत नाहीं. म्हणजे चिन्यांच्या हातीं आपले परवलीचे शब्दहि गेले काय? या गोष्टी फार फार गंभीर आहेत. आपल्या सेनादलांत पंचमस्तंभी कम्युनिस्ट घुसले आहेत व ते मोठ्या प्रमाणावर घुसले आहेत हें आतां उघड झालें आहे. या पंचमस्तंभीयांना हुडकून काढून त्यांना कठोर शिक्षा करणें, हें संरक्षण मंत्र्यांचें प्रथम कर्तव्य आहे, असें मी मानतों.

### निर्धार मात्र हवा

चिनी आक्रमणामुळें आपलें लष्करी दौर्बल्य उघड झालें आहे. शांतता, पंचशील, आशि-याचे नि त्यानंतर जगाचें नेतृत्व आदि मृगजळा-मागें आपण लागलों होतों, त्याचें फळ आपणांस मिळालें आहे. पण आतां तरी डोळे साफ उघडे ठेवून, आपण चीनशीं मुकाबला करायला सिद्ध झालें पाहिजे. 'काळाशीं घन युद्ध करूं मग अब्दालीची काय कथा,' असे उद्गार सदाशिवराव भाऊनें काढले. त्याच कृतनिश्चयानें आपण माओ-चाओला खडे चारण्याची प्रतिज्ञा केली पाहिजे.

चीननें संपूर्ण तयारीनिशी आपल्यावर स्वारी केली. सामर्थ्याचा उच्च बिंदु गाठल्यावर त्यानें भारताच्या स्वारीस हात घातला. यामुळें यापुढें त्याचें सामर्थ्य फारसें वाढणार नाहीं. या उलट आपल्या सामर्थ्य संपादनास आतां कोठें प्रारंभ होत असल्यामुळें आपलें सामर्थ्य यापुढें प्रत्यहि वाढणार आहे. आपलें सैन्य, शूर, हिंमतवान आहे; नैतिकदृष्ट्या आपली बाजू न्यायाची आहे; आपले मित्र आपणास सहाय्य करावयास सिद्ध आहेत; आतां हवा आहे फक्त निर्धार. हा निर्धार आपण टिकविला, संभाजी, दत्ताजी, सदाशिवराव भाऊच्या जिद्दीनें टिकविला, तर खरोखरच अशक्य कांहीं नाहीं. ल्हासावर स्वतंत्र तिबेटचा ध्वज फडकणें अशक्य नाहीं नि पेकिंगवर खऱ्याखुऱ्या लोक-शाहीचा झेंडा फडकणेंहि अशक्य नाहीं. अटके-वर भगवा ध्वज फडकला, त्याचें मूळ रोहिडे-श्वराच्या देवळांत बालशिवाजीनें घेतलेल्या प्रतिज्ञेंत होतें, हा इतिहास आपणास माहीत आहे ना?

•••



एक पानी कथा —वामन प्रभू

# नामदेव आणि कुत्रा

आतां जवळ जवळ साडेनऊ होत आलेले असतात. बसून बसून तो कंटाळलेला असतो. म्हणून खुर्चीचें तोंड फिरवून घेऊन तो समोरच्या झोपड्याकडे पाहूं लागतो. त्यांच्या उजव्या बाजूच्या कोपऱ्यांतच त्यांच्या पाहुण्याची व चौकीदाराच्या उभ्या असण्याची पर्वा न करतां बाया त्यांच्याकडे पाठ करून बसलेल्या असतात. उजव्या बाजूलाच कमंडलूसारखी त्यांचीं टमरेलं असतात.

नऊ वाजून गेलेले असतात. आपल्या सहकाऱ्याची व हाताखालीं काम करणाऱ्या खलाशांची वाट बघत चौकींतल्या खुर्चीवर तो बसलेला असतो. चौकीदार बाहेर उभा राहून बाजूच्या ' Squatters 'च्या वस्तींतून हातांत डब्बे–टमरेलं घेऊन येणाऱ्या माणसांना रेल्वे लाईनच्या पलीकडच्या बाजूला जाण्यास सांगत असतो. बायांनीहि थोडं पलिकडे बसावं म्हणून सुचवित असतो.

चौकीच्या तीनचतुर्थांश भागांत चुना भरून पडलेला असतो. दाराशींच एक घडीचं टेबल व खुर्ची ठेवलेली असते. टेबलावर पाय ठेवून आरामशीरपणें तो खुर्चीवर बसलेला असतो. चौकीच्या उरलेल्या भागांत फावडीं, घमेलें, कुदळी, बादल्या, दोऱ्या, खुंट्या आदि सामान जमेल तिथें जागा पटकावून असतें.

रस्ते तयार झालेले असतात व घरांचे पायवे खोदण्याचें–खोदून भरण्याचें काम सुरू असतें.

अगदीं शेवटच्या रस्त्याच्या कडेलाच पडीत जागेंत दाटीदाटीनें झोपड्या उभ्या असतात. मिळेल तिथं अन् तशा दहा गुणिले वीसच्या जागेवर प्रत्येकानें घर केलेलें असतें. वाटेल तेव्हां वाटेल तसा कामधंदा करायचा किंवा करायचाहि नाहीं व वाटेल तेव्हां खोपट्यांत येवून कच्च्याबच्च्यांत पडायला म्हणून सोय केलेली असते. ती सारी जागा तो ज्या ऑफिसमध्यें कामाला असतो त्या ऑफिसची असते. त्या जागेवरच्च कित्येक वर्षांपासून ' भटके ' म्हणून वर्गवारी केल्या गेलेल्या लोकांचे संसार मजेने उभे असतात! आणि त्या साऱ्या घरांचा त्याला नकाशा तयार करावयाचा असतो.

तो बसला असतो त्या चौकीभोंवतालची जागा नुकतीच ' ले-आऊट ' होऊन सुधारण्यास सुरवात झालेली असते. त्यापूर्वी ती मोकळीच शेती; आणि तिचा उपयोग बाबूच्या वस्तींतले लोकं मोदरी म्हणून करीत आले होते.

रस्ते बांधून होतांच व ती चौकी तिथें येतांच मात्र वस्तींतल्या लोकांना आतां दूर जाणें भाग पडत असते आणि रोज सकाळलाच उठून लोकांना पलीकच्या रेल्वे लाईनच्या पार जाण्यास सांगण्याचें आयुष्यांत कधीं कल्पना न केलेलें काम त्यांच्यांतल्या एकाकडे–चौकीदाराकडे आलेलें असतें.

पण वस्तींतल्या कांहीं लोकांना परंपरेनं प्राप्त झालेली गोदरीची जागा न वापरण्याचं अजूनहि जमत नसते. कांहीं पुरुष तर हट्टानें अजूनहि तीच जागा वापरीत असतात. बायांनी तर कमालच केलेली असते. चौकीदाराकडे न पाहतांच त्या आपल्या येतात, तिथं कोणीं नाहीं असंच मानतात व तोंड फिरवून, लुगड वर करून बसतात. त्यांच्याकडं बोटं दाखवून कांहीं लोक चौकीदाराला समज देतात. कांहींनीं तर चौकीदार त्यांच्याकडून चार आणे हप्ता घेतो म्हणूनही [illegible] ठरविली असते.

तेवढ्यांतच त्यांच्या अगदीं समोरच्या खोपटींतून तोंडांत भाकरीचा तुकडा असलेलं एक कुत्रं धांवत बाहेर पडतं. पाठोपाठच कुत्र्याला शिव्या घालीत, डाव्या हातांत वाटी असलेला व उजव्या हातांतला दगड कुत्र्याला मारण्याकरतां म्हणून हात वर उचललेला एक माणूस बाहेर येतो. त्याच्या कंबरेला खाकी रंगाची कंबरेच्या बरीच खालीं घसरलेली नुस्तीच चड्डी असते. त्याच्या छातीचीं हाडं बाहेर आलेलीं असतात. डोळे खूप आंत गेलेले असतात व डोक्यांवर वाढलेले भुरकट लालसर केस कपाळावर आलेले असतात.

भाकर, कुत्रं आणि तो माणूस पाहतांच त्याला लहानपणां वाचलेल्या संत नामदेवांच्या गोष्टीची आठवण येते. तेवढ्यांत तो माणूस कुत्र्याला हातांतला दगड फेकून मारतोंच. तसे तें कुत्रं अधिकच जोरानं समोर धावतं. नेम हुकल्यानें तो माणूस अधिकच चिडतो. पटकन खालीं वाकून दुसरा दगड उचलतो व कुत्र्याकड भिरकावतो. दगड नेमका कुत्र्याच्या पाठींतच बसतो. तसं तें ' क्यँव ' करून जोरानं ओरडतं. त्याच्या तोंडांतली भाकर त्यामुळें खालीं पडतें. तो ओरडायचं थांबतों. झरकन् वळतो. भाकरी उचलतो व कमंडलू घेऊन बसलेल्या बायांच्या दिशेकडे वळतो.

कुत्र्यामागचा माणूस खालीं वांकून एक मोठा दगड उचलतो. तो आतां बराच चिडलेला अन् त्रस्त दिसत असतों. कुत्र्याला शिव्या देतांना आतां त्याचा आवाज फाटून निघत असतो.

कुत्रं दगड अन् तो माणूस पाहतांच बाया त्याला शिव्या मोजीत उठतात. बाजूला होतात. कुत्र्याच्या तोंडांतली भाकर तेवढ्यांत परत खाली पडते. धाकानंच तें भाकरी न उचलतां पळूं लागतें.

' भोसडीचं. खाउंहि देत नायि,' असं संतापानच म्हणत पळून गेलेल्या कुत्र्याच्या दिशेनें तो माणूस हातांतला दगड भिराकावतो. खालीं पडलेली भाकर उचलून घेतो. उलटी सुलटी करून पहातो. थोडी झटकून घेतो. डाव्या हातांतल्या वाटींत भाकरीचा एक कुटका बुडवतो. वर काढून तोंडांत भरीत, बचा बचा चावीत, लांब लांब टांगा टाकीत खोपटांकडे चालूं लागतो.

चौकींतल्या खुर्चीत बसून तो हें सारं पहातों व लहानपणीं वाचलेली संतनामदेवाची आणि कुत्र्याची गोष्ट आठवूं लागतों. मनींच त्याला हंसूं येतं. चौकीदाराला हांक मारून तो त्याला विचारतो. त्यावर चौकीदार संथपणें उत्तरतो–

' साहेब, यो नामदेव न्हयना! आपल्या कामावरल्या चन्द्रभागाचा लाडला पोरगा ! '

●●●









उन्हाळ्याचे दिवस होते. वाढत्या उकाड्यानें अंगांतून घामाच्या धारा निघत होत्या. अचलेश्वराचे जंगलांतून मी ठेचकळत जात होतो. शिकारीच्यां नादामध्यें चुकलेली वाट हुडकत होतो. चालून चालून पाय थकले तरी कँपची वाट सापडत नव्हती. दिसणारी पाऊल वाट परिचयाची वाटत होती. वाटेचें भान विसरून दिसेल त्या वाटेनें पुढें जात होतो. हातांतल्या बंदूकीचेही ओझं नकोसं वाटत होतं. मुलूख नवखा, जंगल सर्व्हेसाठीं मी आलेलो असतांना निदान सोबत घेऊन तरी बाहेर पडायची बुद्धि मला व्हायला हवी होती. विचारांच्या तंद्रीतून मी अचानक भानावर आलों. पावलें थबकलीं. भरधांव वेगानें एक मेरु आडवा गेला. पावला गणीक पावलांची खसखस उडाली. बंदूक उचलायच्या आत तें श्वापद दिसेनासें झालें. श्वापद गेलें तरी माझी नजर त्या जागेवर खिळून राहिली. गर्द राईमध्यें एक जुनाट इमारतीची भव्य वास्तू उभी होती. त्या इमारतीचे भग्न अवशेष सगळीकडे विखुरले होते.

झाडाझुडपांच्या सावलींत विखुरलेलें ते अवशेष मी पहात होतो. उर्धवट उभ्या राहिलेल्या कमानी, प्रचंड रेखीव स्तंभ, पांढऱ्या दगडांनीं सजलेलें जोतें, संगमरवरी पायऱ्यांच्या पायघड्या हें सारं निरखित मी उभा होतों. भान विसरून तें मी पहात असता माझ्या कानावर पानें चरचरल्याचा आवाज आला. वन्य श्वापदाच्या भीतीनें मी गरकन बंदूक वळवली. माझ्या समोर एक उंचापुरा म्हातारा राजपूत उभा होता. हसऱ्या चेहऱ्यानें तो मला निरखित होता. त्याच्या मस्तकीं राजपुती पागोटें होतें. अंगांत पांढरा कुडता; पायांत चुणीदार विजार होती. कानाच्या पाळीपर्यंत आलेलें पांढरे शुभ्र कल्ले, झुबकेदार मिशा, लांब सरळ नाक, काळे पाणावलेले डोळे त्याचें व्यक्तिमत्व दर्शवीत होतें. जवळ येत त्यानें विंचारले,

'क्या देखते हो !'

'ही इमारत नजरेंत आली. वाटलं पहावं.'





अनुक्रमणिका



**रणजित देसाई यांची** *ही ऐतिहासिक गोष्ट वाचतांना ज्यांच्या अंगावर रोमांच उभे राहाणार नाहींत असा रसिक वाचक विरळा. जीवनांतील एका शाश्वत सत्यावर आधारलेली हीं एक सुंदर गोष्ट...*

'आपण ह्या भागांत नवीन आहांत ?'

'हां ! जंगलाची पहाणी करण्याचं काम माझं आहे. शिकारीसाठीं बाहेर पडलों आणि...'

'वाट चुकली ना ?' म्हातारा हंसत म्हणाला, 'कांहीं हरकत नाहीं. मी दाखवीन वाट.'

'उपकार होतील' मी म्हणालो.

'उपकार कसले त्यांत ?' तो म्हातारा म्हणाला 'आपण दमलेले दिसतां. बसा. विश्रांती घ्या. थकवा जाऊं दे मग जाऊं आपण.'

मी तिथें पडलेल्या एका दगडावर बसलों. थोड्या अंतरावर तो म्हातारा वीरासन घालून बसला. कांहीं वेळ असाच गेला. घाम पुसत मी विचारलें,

'जंगलांत ही इमारत कुणी बांधली ?'

'संग्रामसिंगानें', तो म्हातारा म्हणाला. 'ह्या भागात संग्रामसिंगाची ही गढी प्रसिद्ध होती.'

'मग जंगलांत का बांधली ?'

'ह्या अचलेश्वरावर त्याचं राज्य होतं. फार पूर्वी येथें मोठें वैभव नांदत होतं.' तो म्हातारा म्हणाला.

'मग कशानं राज्य गेलं ? इंग्रजांनीं...'

'नहीं बेटा नहीं ! इंग्रजांनीं नाहीं. अंग्रेज शिवले सुद्धां नाहींत.'

'मग ?' माझें कुतुहल जागें झालें.'

म्हाताऱ्यानें दीर्घ निःश्वास सोडला. तो म्हणाला, 'फार वर्षापूर्वीची कथा आहे. ह्या भागांत मोठमोठी राज्यें होतीं. कर्णावत, शेखावत, हाड्रा, प्रतापगड, नागोर, उदेपूर, जयपूर, अंबर किती म्हणून सांगूं ! जशीं मोठीं राज्यें होतीं तशींच शेंकडों लहान लहान राज्यें पण ह्या भागांत नांदत होतीं. हीं छोटीं मोठीं राज्यें वाढलीं, आपापसांतल्या भांडणांत, परकियांच्या स्वारींत नामशेष झालीं. ह्या संग्रामसिंगाच्या गढीचाही तोच इतिहास आहे. संग्रामसिंग तोडाचा पूर्वज. त्यानं इथं राज्य केलं. ह्याचीच शाखा तोडाला गेली. ह्या संग्रामसिंगाला एक मुलगी होती, शामकुवर. चंद्रासारखें सौंदर्य घेऊन जन्माला आलेली मुलगी ही बापाच्या लाडांत वाढत होती. बाप एकुलत्याएक मुलीचें कौतुक करत होता. मुलीच्या प्रेमांत मग्न झालेल्या संग्रामच्या लक्षांत हें आलं नाहीं की सुस्वरूप मुलीचा बाप होणं हें देखील कित्येक वेळीं संकटासमान असतं. शामकुवरच्या वाढत्या वयाबरोबर तिच्या रूपाची कीर्ती पसरत होती. मालपुराच्या समशेरसिंगाच्या कानावर शामकुवरच्या गाण्याची व रूपाची तारीफ गेली आणि त्यानें सरळ शामकुवरला मागणी घातली. संग्रामसिंगाच्या क्रोधाला सीमा राहिल्या नाहींत. समशेर मातबर होता. संग्रामपेक्षां बलशाली होता पण संग्रामाचं कूळ फार मोठं होतं. समशेरच्या वाढत्या राज्याबरोबरच त्याचा व्यसनी स्वभाव व त्याचीं कुकर्में जगजाहीर झालीं होतीं. संग्रामानें सरळ नकार कळवून टाकला. त्याचा परिणाम काय होणार हें त्याला पुरेपूर माहीत होतें. त्यानें जवळपासच्या सर्व राज्यांना मदतीची विनंती केली पण समशेरचें वाढतें बळ ध्यानीं घेऊन कोणी मदतीला पुढें आलें नाहीं.

आपली सेना गोळा करून संग्राम येणाऱ्या प्रसंगाला तोंड देण्याच्या तयारींत उभा राहिला.

सांगता सांगता तो म्हातारा थांबला. मी विचारलें, 'मग समशेरनें हल्ला केला ?'

'सांगतो ! ती उजव्या बाजूला इमारत दिसते ना ?' म्हाताऱ्यानें बोट दाखवून विचारलें. मी त्या दिशेकडे नजर वळवली. ओळीनें उंच कमानी असलेली ती इमारत मी पहात होतो. म्हातारा सांगत होता.

'तो पीलखाना ! तिथें हत्ती असत. ह्या पीलखान्यांत एक हत्ती होता. ऐरावत.' साऱ्या हत्तींत तो उठून दिसे. नांवासारखाच तो होता. शरीरानें जसा मोठा तसाच मनानेंही. पाठीवर अंबारी ठेवली तर पिलखान्याच्या उंच कमानीला अंबारीचें टोक टेकायचं. ऐरावत अचलेश्वराचं वैभव होतं.

'एका चांदण्या रात्रीं संग्रामानें ऐरावताला चुपचाप बाहेर काढला. सेवकांच्या करवी दोन मोठ्या संदूका ऐरावताच्या हौद्यांत ठेवल्या गेल्या. खास माहुत महिपतीला घेऊन संग्राम बाहेर पडला. ऐरावत जंगलातून जात होता. जंगलाची दाटी वाढत होती. टिपूर चांदण्यांत जंगल नहात होतं. रातकिड्यांचा अखंड नाद उठत होता. एखादं वाघूळ किंवा वन्यपक्षी फडफडत जाई तेवढ्याच आवाजाची जाग लागे. जंगल माथ्यावर जातांच माहुतानें हाक मारली.

'सरकार !'

संग्राम डुलक्या घेत होता. त्यानें डोळे उघडले.

'काय महिपती ?' संग्रामनें विचारलें.

'सरकार ही जागा बरी आहे. आड वाटेला आहे.'

संग्रामनें निःश्वास सोडला व म्हणाला, 'ठीक आहे.'

ऐरावत पाय मोडून बसला. दोघांनीं संदूका उतरल्या. महिपतीनें आणलेलें कुदळ–खोरें जमिनीवर टाकलें. उंच गेलेल्या एका वृक्षाखालची जागा निवडून महिपतीला खड्डा खणण्याची आज्ञा झाली. महिपती खड्डा खणत होता. ऐरावत ते पहात होता. खड्डा तयार झाल्यावर संदूका खड्ड्यांत घातल्या गेल्या. संग्रामानें मोठ्या प्रेमानें ऐरावताला पुढें आणलें आणि कोसंब्याच्या रसाचे मोठे मोधे हत्तीसमोर ठेवले. मोध्यांचीं तोंड उघडतांच उग्र वास दरवळला. रसाचा वास घेऊन ऐरावतानें मोध्यांत सोंड घातली. आवडीनें तो रस पिऊन होतांच संग्राम ऐरावताजवळ गेला आणि म्हणाला,

'शामकुवर......शामकुवर...... ध्यानमें रखना ऐरावत......शामकुवर.'

जसं कांहीं समजल्यासारखें, ऐरावतानें सोंड वर करून तुतारी फुंकली. साऱ्या जंगलात तो आवाज उठला. संग्राम म्हणाला, हां टीक है ऐरावत ! शामकुवर...'

खड्डा बुजवण्यांत आला. त्यावर महिपतीनें कुदळ–खोरें टाकलें. इशारत करतांच ऐरावतानें दाखवलेल्या प्रचंड शिळेला मस्तक लावलें.









अनुक्रमणिका

खड्ड्याच्या जागेवर ती शिळा स्थिर झाली आणि दोघे ऐरावतावरून परतले. गढीवर यायला पहाट होत आली होती. संग्रामाच्या पाठोपाठ महिपती उतरला. एकापाठोपाठ दालनं ओलांडीत दोघे जात होते. संग्रामाच्या मागून दोघे भुयारांत उतरले. भुयारांत जातांच संग्रामानें हातांतील शामदाणी खालीं ठेवली व तळघराचा दरवाजा लावून घेतला. संग्राम भरल्या आवाजांत म्हणाला,

' महिपती '

' हां सरकार माहीत आहे. तुमच्यासाठीं माझा जीव खर्ची पडतो आहे ह्यांत मला आनंद आहे. ऐरावताला मुलाची सवय आहे. लक्षात ठेवील तो. माझ्या घराची काळजी वाटत नाहीं. तुम्हीं त्याचं कल्याण कराल.

संग्रामाचे डोळे भरून आले. त्यानें विचारलें,

' आणखीन काहीं. '

' काहीं नाहीं सरकार. देवाच्या कृपेनें आपल्यावर आलेलं संकट टळावं एवढीच इच्छा. '

संग्रामानें आपली तलवार उपसली. महिपती म्हणाला,

' सरकार '

' काय ? ' संग्रामनें विचारलें.

' मी गेल्यावर ऐरावताला चुकल्यासारखं होईल. झोप यायची नाही त्याला. मुलाची सवय आहे पण ओढ लागली नाहीं. '

' मग ? '

'आपल्या कुवरदेवींना सांग. त्यांच्यावर ऐरावताचं भारी प्रेम आहे. त्याला गाणं आवडतं. तो विसरेल मला... '

पुढं महिपतीला बोलवलें नाहीं. त्यानें गुढगे टेकले. हात जोडून त्यानें मान वाकवली. सारं बळ एकवटून संग्रामानें तलवार उचलली आणि क्षणात ती महिपतीच्या मानेवर उतरली. रक्तलांछीत तलवार फेकून संग्राम जेव्हां भुयाराबाहेर आला तेव्हां उजाडूं लागलें होतें.

संग्राम लढाईची तयारी करीत होता. तटाची डागडुजी चालू होती. गढीत धान्याचे साठे केले जात होते. सरदार गोळा होत होते. एके दिवशीं दरबार भरला असतां जासूद खलिता घेऊन आला. साऱ्यांच्या नजरा खलित्यावर खिळल्या होत्या. खलिता वाचून संग्राम म्हणाला,

'अरे ! ढोकलचा जसवंत माझा दोस्त. त्याचा मुलगा अभय येतो आहे त्याला अशा तऱ्हेनें द्वारावर तिष्ठत ठेवणें इष्ट नव्हे. चला त्याला सामोरे जाऊ. '

संग्राम जेव्हां प्रासादाच्या महाद्वारीं गेला तेव्हां ढोकलचा राजपुत्र अभय समोरून येत होता. त्या तरुण राजपुत्राकडे संग्राम प्रेमभरानें पहात होता. अभयचं वय विशीच्या आंतबाहेर होतं. राजपूत तेज त्याच्या चेहऱ्यावर दिसत होतं. संग्रामच्या नजीक येतांच अभयनें संग्रामचे पाय शिवले. अभयला मोठ्या प्रेमानें कवटाळून संग्राम म्हणाला,

' एकटाच का आलास ? तुझ्या पिताजीला घेऊन यायचं होतं ना ?'

' ते आजारी आहेत, म्हणून ते येऊं शकले नाहींत' अभयनें अदबीनें उत्तर दिलें.

अभयचा हात धरून क्षेमकुशल विचारीत संग्राम दरबारीं आला. दरबारला ओळख करून देऊन संग्राम म्हणाला, ' आमच्या अडचणीच्यावेळीं फक्त एकच मित्र जागला. त्यानें आपल्या मुलाला मदतीला पाठवलें.'

समशेरसिंगाच्या भीतीनें दबलेल्या सरदारापैकीं एक उठला. त्यानें विचारलें, ' हुजूर किती कुमक आली ? '

' अभयची मान खाली गेली. संग्राम म्हणाला, ' अभयचे पिताजी आजारी आहेत. त्यांच्याजवळ आज मोठी कुमक नाहीं म्हणून फक्त युवराजांना त्यांनीं पाठवलं आहे. '

त्या सरदाराच्या चेहऱ्यावर छद्मी हास्य उमटलें. ते पहातांच संग्रामच्या कपाळावर आठ्या पडल्या. तो तीक्ष्ण आवाजांत म्हणाला,

' कुमकेपेक्षांही मोलाची मदत झाली आहे. एकुलत्या एक मुलाला मित्र-सहाय्यासाठीं पाठवायचं ह्याचा अर्थ तुम्हांला कळायचा नाहीं. तो मी समजूं शकतो. आज अभय योग्य वेळीं आले आहेत. समशेरनें हल्ला केला तर त्या प्रसंगीं उभा रहाण्यासाठीं एका सेनापतीची आपल्याला गरज होती. अभयला आज मी तो मान देत आहे.'

इशारतीबरोबर तबक पुढें करण्यांत आलें. आपल्या हातानें संग्रामानें कंमरेला जरीचा दुशेला बांधला. त्यांत तलवार-कटयार खोवली. अचलेश्वराचं सेनापतीपद अभयच्या हातीं आलं.

सकाळच्यावेळीं अभय तटाची पहाणी करत होता. मोक्याच्या जागा समजावून घेत होता. फिरत फिरत तो दक्षिणेच्या पिलखान्याजवळ आला आणि त्याचं लक्ष पिलखान्याच्या आवारांत शिरणाऱ्या राजकन्येकडे गेलें. राजकन्येचें लक्ष अभयकडे गेलें नव्हतें. अचानक शामकुवरचं लक्ष अभयकडे गेलें. दोघांच्या नजरा एकमेकांना क्षणभर भिडल्या आणि दुसऱ्याक्षणीं शामकुवरनें बुरखा घेतला. गोंधळलेला अभय म्हणाला,

' माफ करा ! तटाची पहाणी करत येत होतो. कल्पना नव्हती की आपण इथें याल म्हणून. '

शामकुवर शरमून उभी होती. त्याचवेळीं अभयच्या कानावर हत्तीचें ओरडणें ऐकूं आलें. त्यानें पाहिलें तो त्या दोघांच्या रोखानें एक प्रचंड हत्ती येत होता. पळण्याला उसंत नव्हती. अभयनें शामकुवरच्या दंडाला धरून मागे

---

पान ७ वरून

भाणखी आटत चालला. पार काळजीनें खंगला ' किती सुंदर चित्र. आपणापुढें तो जलाशय साकार होतो. त्याची शीर्ण काया दिसते. परोपकाराच्या चिंतेनें निघणारे त्याचे निश्वास आपणास ऐकूं येतात आणि हळूहळू त्या जलाशयाच्या जागीं आपलें सर्वस्व परांसाठीं वेचणारा आणि यापुढें परोपकार करतां येणार नाहीं म्हणून अंतकालीं झुरणारा ' संत ' उभा रहातो.

असो. जगन्नाथ हा संस्कृतचा शेवटचा कवी. भाषाच्या काली आपल्या मोहिनीनें भुवनास मोहविण्यास आरंभ करणाऱ्या निदग्ध संस्कृत कविता कामिनीचा हा शेवटचा विलास. या विलासांत दर्शन देण्यास ही दोन हजार वर्षांची कामिनी प्रवृत्त झाली तेव्हां तिनें संपूर्ण आत्मविश्वासानें पदक्षेप केला कीं मी रसिकांना मोहवीनच मोहवीन. आणि हा विचार त्या चिरनूतन रमणीनें सार्थ केला. म्हणून जगन्नाथ म्हणतो, ' मधुबिंदू, वारुणी, अमृत अथवा कांतेचा ओंठ यांची माधुरी कळत नाहीं असा कोणी असूं शकेल. पण जगन्नाथाची कविता वाचून ज्याचें मन आनंदानें मोहून जात नाहीं असा जीवन्मृत कुठें कोणी आढळेल कीं ?

—आनंद साधले

खेचलं आणि तिला पाठीशीं घालून अभयनें तलवार उपसली. सारा प्रकार क्षणांत शामकुवरच्या ध्यानीं आला. तलवारीच्या हातावर आपला हात ठेवत ती ओरडली,

'थांबावं युवराज.'

भरकन शामकुवर पुढें झाली आणि हत्तीच्या रोखानें धांवत सुटली. शामकुवर नजीक जातांच हत्ती थांबला. त्यानें आपली सोंड शामकुवरच्या मानेभोंवती टाकली. शामकुवर हंसत होती. हत्तीची सोंड कुरवाळीत होती. अभय नजीक येतांच शामकुवर म्हणाली,

'अभय, हा ऐरावत माझ्या सवयीचा आहे. मला पाहिलं आणि धावत आला.'

'बांधून ठेवत नाहीं.?'

'ऐरावताला! बांधण्याची काय गरज. ह्यानें आमच्या दोन पिढ्या पाहिल्या पण ह्याला बांधण्याची गरज भासली नाहीं. ऐरावत हे आपले पाहुणे आहेत.'

'त्याला नांव नाहीं सांगितलंत?' अभयनें हंसत विचारलें.

क्षणभर अभयवर नजर रोखून शामकुवर म्हणाली, 'आपली ओळख ज्याची त्यानें करून घ्यावी.'

आणि एवढें बोलून ती महालाकडे धावत सुटली.

संग्रामाच्या गढीला युद्धक्षेत्राचें स्वरूप येत होतें. तोफा साफसूफ केल्या जात होत्या. संग्राम अभयला घेऊन साऱ्या गढीची माहिती देत होता. एके दिवशीं तो अभयला घेऊन संग्राम महालाखालच्या तळघरांत गेला. तेथें रचलेल्या पोत्यांच्याकडे बोट दाखवीत संग्राम म्हणाला,

'अभय, हें दारूघर. आपल्या साठ्यांत दारूबत्ती विपुल आहे. पन्नास तोफा जरी अखंड धडाधड करीत राहिल्या तरी कैक दिवस ही दारू पुरेल.'

दुसऱ्या दिवशीं निवडक पंचवीस तोफा गाड्यावर चढवल्या गेल्या आणि गाडे गढीबाहेर पडूं लागलें. पांढऱ्या शुभ्र घोड्यावर बसून अभय ते निरखित होता. संग्रामसिंगाच्या नजरेंत ते येतांच तो अभयकडे गेला.

"अभय! ह्या तोफा कुठें नेता?" संग्रामने विचारलें.

अभय म्हणाला, "संगाचाचा! पन्नास तोफांची गरज गढीला नाहीं. कांहीं तोफांचे जंगलात मोर्चे बांधतो. शत्रू दाराशीं आल्यावर तोफा जागून उपयोग होणार नाहीं."

जंगलांत मोर्चे बांधले गेले. जेथून हल्ले होण्याची शक्यता होती त्या वाटा रोखल्या गेल्या. टेहळे बसवले गेले.

सकाळच्यावेळीं अभय गढींतून फिरत होता. महालाच्या मागे असलेल्या कृष्णमंदिरांतून भजनाचे सूर उमटत होते. नकळत अभयची पावलें तिकडे वळलीं. अभय मंदिराजवळ जायला आणि गाणं बंद पडायला एकच गाठ पडली. अभय मंदिराच्या पायऱ्या चढत असता मंदिरांतून दासीसह शामकुवर बाहेर आली. अभयला निरखित ती म्हणाली,

'आपण! एवढ्या लौकर!'

'हां', अभय स्वतःला सावरत म्हणाला, 'दर्शनाला आलो होतो.'

'आपलं स्नान झालं?' खट्याळपणें शामकुवरनें विचारलं,'

'नाहीं! माझ्या लक्षांतच नाहीं. स्नान... करूनचं मी येईन' म्हणत अभय गडबडीनें तेथून निघून गेला. शामकुवरच्या चेहऱ्यावर हासूं फाकलें होतें.

एके दिवशीं ती वार्ता आली. समशेर संग्रामवर स्वारी करण्याशाठीं मालपुराहून बाहेर पडला होता. तो नजीक येत असल्याच्या बातम्या दररोज येत होत्या. संग्रामाच्या सीमेवर येऊन समशेरने तळ दिला.

संग्रामचा दरबार भरला होता. सारे चिंतातूर दिसत होते. समशेरचें सैन्य दहा हजाराच्या आसपास होतें. संग्रामाची कुमक फारतर पांचसहा हजाराच्या आसपास होती. समशेरनें शेवटचा खलिता पाठवला होता. शामकुवरच्या मागणी खेरीज समशेरची दुसरी अट नव्हती. संग्रामनें अभयला सल्ला विचारला. साऱ्या दरबारावरून नजर फिरवीत अभय म्हणाला,

"माझें वय ल्हान. अनुभव थोडा. तरी पण मला असं वाटतं कीं जोंवर अभिमानानं माणसाला जगता येतं तोवरच त्यानं जगावं. संगाचाचा आपण आज्ञा करावी. नशिबीं यश असेल तर तें मिळेल. पराजय झाला तरी तो अभिमानाचा ठरेल.'

'थांबा कुमार!' संग्राम म्हणाला, 'तुमच्या भाषणाचं मला कौतुक वाटतं. पण माझे काळ्याचे पांढरे झाले. आतां ह्या विचारानें मन सुखावत नाहीं. समशेरच्या सैन्याला सामोरं जाणं म्हणजे मृत्यूला कवटाळण्यासारखें आहे.'

'मृत्यू अटळ आहे हें ध्यानीं आलें तर मृत्यूची भीति उरत नाहीं.'

"कुमार, असा विचार करू नका. हा तुमच्या वा माझ्या वैयक्तिक जीवनाचा प्रश्न नाहीं. राजपुतानी पराजय जो घेतला तो ह्याच वृत्तीमुळें. नुसतं मरण्याला सिद्ध रहाणं म्हणजे विजय प्राप्त करून घेणं नव्हे. संधीची वाट पहायला आपण शिकलं पाहिजे. समशेरशीं मैत्री जोडता आली तर ती जोडली पाहिजे."

सारा दरबार चकीत झाला. चिकांऱ्या








पडद्याची सळसळ झाली. अभय म्हणाला, "म्हणजे समशेरची मागणी मान्य करायची?"

संग्राम हसून म्हणाला, "कुणीं सांगितलं! मागणी मान्य न करता मैत्री जोडता आली तर पहावं समशेर इथें आला. त्याला विश्वास वाटला तर कदाचित खंडणीनेंही तृप्त होईल."

अभय संतापानें उठून उभा राहिला. राग आवरण्याचा प्रयत्न करीत तो म्हणाला, संगाचाचा, आपण मला पूज्य आहां, पण मला सांगावसं वाटतं'

'सांगाना, आम्हांला राग येणार नाही,' संग्राम म्हणाला.

'दुर्बळांच्या मैत्रीला फारसा अर्थ असत नाहीं. त्या पेक्षां...'

'समजलं कुमार! फक्त एका माणसाच्या प्रतिष्ठेसाठीं एवढ्या माणसांचा संहार ठीक नाहीं. आमच्याबद्दल तुमच्या मनांत संदेह असेल तर तुम्ही ह्यांत भाग घ्यावा म्हणून मी आग्रह करणार नाहीं.'

अभयनें सरकन आपली तलवार काढली आणि संग्रामासमोर ठेवत तो म्हणाला, 'आपल्या आज्ञेत रहाण्याचा मला हुकूम आहे निष्ठेसाठीं तलवार आपल्यासमोर ठेवली आहे.'

संग्रामानें उठून ती तलवार परत अभयच्या हातीं दिली आणि तो सद्गदित आवाजांत म्हणाला, 'युवराज तुमच्याबद्दल आमच्या मनांत शंका नाहीं. तुम्ही उद्यां समशेरची गाठ घ्या. त्याला आमचें आमंत्रण देऊन मानानं इथें घेऊन या. कदाचित त्याचं मन बदलेल.'

त्या रात्रीं संग्रमानें आपल्या महालांत अभयला बोलावलें. जेव्हां अभय महाली गेला तेव्हां तेथें शामकुवरही होती. संग्राम म्हणाला,

'अभय! उद्यां कदाचित समशेर इथें येईल. काय होईल हें सांगता येत नाहीं. मी जिवंत राहिलो तर शामकुवरचा हात मी तुमच्या हातीं देईनच. दुर्दैवानें तसें घडलें नाहीं तर तिला संभाळा. ती जबाबदारी तुमची.' आणि शामकुवरकडे वळून तो म्हणाला, "मुली! ह्यांची आज्ञा मोडूं नको. ह्यांच्या हातीं तू सुरक्षित आहेस.'

दुसऱ्या दिवशीं अभय आपल्या पथकासह समशेरसिंगाला भेटायला गेला. समशेरनें तात्काळ आमंत्रण स्वीकारलें. समशेरची छावणी अंचलेश्वराचे मैदानांत आणली गेली. समशेर आपल्या खास तुकडयासह संग्रामाच्या गढीत आला. संग्रामानें जरजवाहीर नजर करून समशेरचें स्वागत केलें. समशेरला खूश करण्यासाठी नृत्यगायनाचे कार्यक्रम ठेवले होते. मेजवान्या झडत होत्या. मदिरेच्या सुरया रिकाम्या होत होत्या. अभय हें सारें पहात होता.

पांचव्या दिवशीं रात्रीं गाण्याची बैठक होती. एका बैठकीवर समशेर संग्राम बसले होते. समशेरनें भरपूर मद्य घेतलें होतें. गाणें संपल्यावर समशेर म्हणाला,

'आम्ही खूप गाणें ऐकतों इथें! पण जें गाणं ऐकण्यासाठीं आलों तें गाणं कुठं आहे? किती दिवस आम्ही वाट पहाणार?'

'राजकन्या बैठकींत गात नसते समशेर' संग्राम म्हणाला.

'ती तुमची राजकन्या असेल पण माझी भावी पत्नी आहे. तिनं कुठं गावं हें मी ठरवणार,' समशेर उर्मटपणें म्हणाला.

आपला क्रोध आवरत संग्राम म्हणाला, 'समशेर, साऱ्याच गोष्टी सत्तेनं घेता येत नाहींत. मी हवी ती खंडणी द्यायला तयार आहे.'

'माझी खंडणी मी सांगितली आहे' समशेर मद्याचा प्याला ओठीं लावत म्हणाला.

'हे राजपुतांना शोभत नाहीं.'

'मग पृथ्वीराजला तें कसं शोभलं?'

संग्रामचा संयम सुटला. तो ओरडला, 'कशाला नांव बाटवतोस? कावळ्यानं हंसाची बरोबरी करावी! हं! जनानखान्यांत पन्नास बायका बाळगणारा तू, तिथं माझी मुलगी देऊं म्हणतोस! कुलशीलाची ओळख आहे तुला?'

'संग्राम!' संतापानें बेभान होऊन समशेर म्हणाला,

'खामोष! चालता हो इथून! कमानी कुत्ता कही......' पण पुढचे शब्द संग्रामला पुरे करतां आले नाहींत. समशेरचा जंबिया छातींत केव्हां शिरला तेंही संग्रामला कळलें नाहीं.......'

संग्रामच्या सरदारांनीं तलवारींना हात घातला त्याचवेळीं चारीबाजूनें समशेरचे लोक आंत घुसलें. सारी गढी क्षणांत समशेच्या हातीं गेली.

रक्ताच्या थारोळ्यांत संग्राम पडला होता. अभय नजीक गेला. त्याचे डोळे भरून आले होते. आंतून शामकुवर तीरासारखी आली आणि ती पित्याच्या अंगावर पडली. तिच्या हाकेबरोबर कष्टानें डोळे उघडून संग्राम म्हणाला,

'शामकुवर! लक्षांत... ठे..व.शामकुव..र'. संग्रामनें मान टाकली. शामकुवरच्या आक्रोशाला सीमा राहिल्या नाहीत. शामकुवर दासींसह आंत निघालेली पहातांच समशेर ओरडला,

'जाते कुठे! आम्हांला गाणं ऐकायचं आहे.'

अभय पुढें झाला. हात जोडून तो म्हणाला, 'हुजूर, आज जाऊं देत तलवारीच्या जोरावर राज्य मिळवता येतं स्त्रीच्या प्रेमाला हें चालत नाहीं. जरा सबूरीनं घ्यावं.'

अर्धवट शुद्धींत असलेला समशेर उठत म्हणाला, 'ठीक! आम्हांला एकदम मान्य आहे. पण उद्या तिला गावच लागेल.'

'जरूर गाईल हुजूर! जरूर गाईल!'

गढीव पहारे बसवून समशेर आपल्या तळावर गेला. दुसऱ्या दिवसापासून अभय समशेरची खुशामत करीत होता. समशेर अभयवर विश्वास ठेवत होता. संग्रामाचे दिवस संपताच शामकुवर समशेरपुढें गाईल हें वचन अभयनें दिलें होतें. उलटणाऱ्या दिवसाबरोबर अभय अस्वस्थ होत होता. तो दिवस येऊन ठेपला. समशेर संग्रामाच्या गढीत शामकुवरचें गाणें ऐकण्यासाठीं येणार होता. शामकुवरच्या महालांत अभय खालीं मान घालून उभा होता. संतापानें शामकुवर थरथरत होती.

'राजकुमार, आपण राजपूतच ना? शंका येते मला.'

'ऐकावं माझं,' अभय म्हणाला, 'प्रसंग पाहून माणसानं वागायला हवं.''

'तेंच म्हणते मी. असे अनेक प्रसंग राजपुतावर आले. अभयकुमार तुम्ही मला कट्यार आणून दिली असतीत तरी मी आनंदानें तिला माझ्या हृदयांत स्थान दिलें असतें. पण ज्याचे हात बाबांच्या रक्तांत रंगले त्याच्यापुढें शरणागत होऊन मी गाऊं म्हणता? त्याला माझं प्रेतही दिसणार नाहीं.'

'शामकुवर...' अभय म्हणाला.

'तें नाव घेऊं नका! तो अधिकार तुमचा राहिला नाहीं.' शामकुवरला हुंदका फुटला. ती म्हणाली, 'विसरलात तुम्ही. बाबांनीं तुमच्या हातीं माझा हात दिला होता.'

'ठीक आहे कुवरदेवी, तें नातं मान्य नसेल तर माझा आग्रह नाहीं. पण पित्याची आज्ञा विसरूं नये एवढंच सांगायचं आहे.'

'कसली आज्ञा?'

'माझी आज्ञा मोडूं नको म्हणून सांगितलं होतं. देवी एवढी एकच विनंती ऐका. पटलं तर मला निरोप पाठवा.'

संग्राम प्रासादांत अभयनें बैठकीची जय्यत

...पान ५५ वर








*सर्व जगतांत भारताचें नांव उज्ज्वल करणाऱ्या या महान पुरुषाच्या जन्मशताब्दिनिमित्त त्यांची ही जीवनस्मरणी येथें देत आहोंत.....*

# स्वामी विवेकानंद



सदानंद चेंदवणकर

शंभर वर्षांपूर्वी आमच्या भारतांत एक महान त्यागी, देशभक्त तेजःपुंज साधुपुरुष जन्माला आला. या दिव्य पुरुषानें थोर तत्वज्ञानी व अप्रतिम वक्ते म्हणून आंतरराष्ट्रीय कीर्ति संपादन करून जगांत आपलें नांव अजरामर करून ठेवलें. त्या महान व्यक्तीचें नांव आहे स्वामी विवेकानंद. भारतीय तत्वज्ञानाचा सर्व जगभर प्रसार करणारे अलौकिक पुरुष म्हणून अजूनहि विवेकानंदांचें नांव सर्वत्र घेतलें जातें.

स्वामी विवेकानंदांचें राशिनाम वीरेश्वर आणि व्यवहारांतील खरें-खुरें नांव नरेंद्रनाथ. त्यांच्या वडिलांचें नांव विश्वनाथबाबू आणि आईचें भुवनेश्वरी. ते जातीनें कायस्थ ब्राह्मण. स्वामीजींचा जन्म पौष कृष्ण सप्तमी, विक्रमसंवत १९१९ शके १७८४ म्हणजेच सोमवार ता. १४ जानेवारी १८६३ रोजी मकरसंक्रांतीचे दिवशीं सूर्योदयापूर्वी कलकत्त्याजवळच असलेल्या सिमूलिया या गांवी बंगालमधील प्रसिद्ध व प्रतिष्ठित दत्त घराण्यांत झाला. या घराण्याची पूर्वपरंपराहि आध्यात्मिक वैभवानें नटलेलीच आहे. ‘ शुद्ध बीजा पोटीं फळें रसाळ गोमटी ’ या उक्तीप्रमाणें विवेकानंद या श्रेष्ठ व्यक्तीच्या कुळाचा इतिहासहि उज्ज्वल असाच आहे.

स्वामींचे आजोबा दुर्गाचरणदत्त बंगालमधील प्रसिद्ध वकील होते. संस्कृत व पर्शियनचा त्यांनीं अभ्यास केला होता. लहानपणापासूनच त्यांचा परमार्थाकडे ओढा. त्यामुळें विवाहानंतर पहिला मुलगा जन्मल्याबरोबर त्यांनीं संन्यास घेतला व ते वयाच्या पंचविसाव्या वर्षींच काशीयात्रेला निघून गेले.

स्वामींचे वडील विश्वनाथबाबू कलकत्ता हायकोर्टांत वकीली करीत. आपल्या वडिलांचाच वकिलीचा धंदा पुढें चालवून त्यांनीं खूप नांवलौकिक मिळविला. ते मोठे विद्वान होते. त्यांची ज्ञानलालसाहि अतुलनीय अशी होती. औदार्य, दीनवत्सलता, अध्यात्मप्रवणता, उच्च शील व आत्मविश्वास या गुणांच्या जोरावर त्यांनीं आपल्या कुलाचें नांव राखलें होतें.

स्वामींची माता भुवनेश्वरी मोठी बाणेदार, सुस्वभावी, आदर्श आर्य स्त्री होती. तिचा चेहरा भव्य, उदात्त होता आणि त्यावर दिव्य शक्तीचें तेज ओसंडत असे. रामायण, महाभारत इ. पौराणिक ग्रंथांचे ती वाचन करी व शंकराचें नित्य नेमानें पूजन–अर्चन मनोभावें करीत असे. अपत्यसंपदा म्हणून तिला लागोपाठ दोन मुली झाल्याः आपल्याला मुलगा व्हावा म्हणून तिनें काशीविश्वेश्वराला नवस केला व पुढें त्याच्याच प्रसादानें मुलगा झाला म्हणून त्याचें नांव वीरेश्वर असें ठेवण्यांत आलें. स्वामीजी लहानपणीं दिसण्यांत अंगापिंडानें अगदीं हुबेहूब आपल आजोबा दुर्गाचरण यांचेसारखे दिसत म्हणून त्यांचें नांव दुर्गादास ठेवावें असाहि एक सूर त्यांचें नांव ठेवतांना उमटला होता. परंतु माता भुवनेश्वरीस ‘ वीरेश्वर ’ हेंच नांव पसंत असल्यामुळें तें नांव ठेवण्यांत आलें. पण व्यवहारांत त्या मोठ्या नांवाचें संक्षिप्त रूप ‘ विले ’ असें झालें आणि पुढें कांहीं दिवसांनीं पाळण्यांतील हें नांव दूर होऊन ‘ नरेंद्र ’ हें नांव रूढ झालें.

वयाच्या सहाव्या वर्षी ते शाळेंत जाऊं लागले. शाळेंत त्यांची बुद्धिमत्ता चांगलीच चमकून दिसली. पाठांतरशक्ति तर भलतीच तीव्र होती. आपल्या विलक्षण पाठशक्तीनें त्यांनीं सर्व गुरुजनांना चकित केलें. ह्या वयांत मुक्तिबोध नांवाचें संस्कृत व्याकरण ते तोंडपाठ म्हणून दाखवीत नि रामायण–महाभारतांतील उतारे धडाधड म्हणत असत.

१८७० सालीं वडिलांनीं त्यांना पं. ईश्वरचंद्र विद्यासागर यांच्या पाठशाळेंत घातलें. येथेंहि त्यांची अक्कल हुशारी दिसून आली. ते











अनुक्रमणिका

जसजसे मोठें होऊं लागलें तसतसें त्यांच्यांत प्रामाणिकपणा व सत्य भाषण हे स्वभावगुण व स्वाभिमान आणि अन्यायाची चीड या गोष्टी उत्कटतेनें दिसून येऊं लागल्या.

अलौकिक बुद्धिमत्ता, खेळाडूपणा व तेजस्विता या गुणांच्या जोरावर त्यांनी शाळेंत चांगलेंच नांव कमावलें व १८७९ मध्यें ते कलकत्ता विद्यापीठाची प्रवेश परीक्षा पहिल्या वर्गात उत्तीर्ण झाले, तेव्हां वडिलांनीं त्यांना एक घड्याळ बक्षीस दिलें.

वयाच्या सोळाव्या वर्षी नरेंद्रांच्या वृत्तींतला खोडकरपणा व स्वच्छंदीपणा कमी होऊन स्वभावाचा उमेदपणा व बुद्धिमत्तेचें तेज दिसूं लागलें. शरीरांत असाच बदल होऊन तारुण्यास योग्य अशी उंची, रुंद छाती व सशक्त शरीर व रेखीव बांधा असा डौलदार आकार त्यांना आला. तोंडावर गांभिर्याची छटा उमटली; डोळ्यांतून सद्‌गुणाचें प्रतिबिंब डोकावूं लागलें. पहाणाऱ्यास असेंच वाटावें कीं राजतेज येथें चमकत आहे.

प्रवेश परीक्षेनंतर कॉलेज शिक्षणास त्यांनीं आरंभ केला. या कालांत आपला अभ्यास मर्यादित न ठेवतां पाश्चात्य तर्कशास्त्रावरील इंग्रजी, बंगाली असे उत्तमोत्तम ग्रंथ त्यांनीं अभ्यासिले. त्यांच्या मनाचा ओढा तात्विक विचारांकडे झुकूं लागला. निबंध लेखन आणि भाषा-सौंदर्य हे दोन विषय त्यांच्या आवडीचे झाले आणि गणित, न्यायशास्त्र व तत्वज्ञान यांतहि त्यांनीं प्राविण्य संपादन केलें. इंग्रजी भाषेवर प्रभुत्व मिळवून वक्तृत्वाची कलाहि त्यांनी संपादन केली. नरेंद्रांचा आवाज अत्यंत मधुर असून गायनकलाहि त्यांनीं हस्तगत केली. एकदां वर्गात अध्यापक येण्यास उशीर झाल्यावर सर्व विद्यार्थ्यांनीं नरेंद्रास गाणें म्हणण्यास सांगितलें. आणि नरेंद्रांनेंहि त्या दोनशें विद्यार्थ्यांना आपल्या गानमाधुर्यानें मुग्ध करून सोडलें. नरेंद्राचें तें गाणें संपेपर्यंत अध्यापक बाहेर उभे राहिले. गायनाबरोबरच त्यांनीं हिंदी, उर्दू व पर्शियनचा पण अभ्यास केला.

कॉलेजच्या चार वर्षांच्या जीवनांत नरेन्द्रांचें मन अधिकाधिक गंभीर विचारी होत गेलें. स्वभाव भावनाशील, ध्येयप्रवण व सत्यशोधक असा झाला. जगांतील सुखोपभोगाकडे त्यांचें लक्ष लागलें नाहीं. निसर्गाचा पडदा दूर सारून यां विश्वाचें रहस्य शोधून काढावे अशी तीव्र इच्छा त्यांच्या मनांत प्रबळ होऊं लागली. या मनःस्थितींत राजा राममोहन रॉय यांच्या ब्राम्हो समाजाकडे त्यांचें मन आकर्षिलें गेलें. या समाजानें कांहींसे क्रांतिकारक विचार तत्कालीन बंगाली समाजापुढें मांडले होते. गोऱ्यांचें राज्य भारतांत आल्यावर पाश्चात्यांची संस्कृति व सामर्थ्य यांना यशस्वी जोड देण्याकरितां विस्कळीत झालेल्या हिंदु समाजानें संघटितपणें कसें उभें रहावें या विचारानें प्रेरित होऊन या समाजाची स्थापना करण्यांत आली होती. निराकार परमेश्वराची भक्ति हें या समाजाचें मुख्य तत्व होतें व समाजांतील अंधश्रध्दा, रूढी, देवभोळेपणा वगैरे दोष काढून जातीभेद, स्त्रीशिक्षण, बालविवाह, यांसारख्या प्रश्नांचा योग्य तो विचार होऊन त्यांत सुधारणा व्हावी असा यत्न हा समाज करीत होता. तेव्हां हा समाज ही एक आदर्श संस्था आहे अशी नरेंद्रांची श्रध्दा झाली व ते समाजाच्या सभांना नियमितपणें जाऊं येऊं लागले व पुढाऱ्यांच्यांत मिळूं मिसळूं लागलें. विशेषतः सुप्रसिध्द कार्यकर्ते केशवचंद्र सेन यांच्या कार्याचा त्यांच्या मनावर खूप परिणाम झाला व त्यांच्यासारखे सद्‌गुण आपल्यांत निपजावेत अशी तीव्र इच्छा त्यांच्या मनांत उत्पन्न झाली. कांहीं काळ समाजाच्या वातावरणांत त्यांच्या मनाला स्थिरता मिळाली पण त्यानंतर त्यांच्या मनांतील तत्वशोधनाची इच्छा बळावत चालली व जो वर्णनातीत आहे त्याचेकडे त्यांचें मन धांव घेऊं लागलें.

नरेंद्रांचा विश्वविद्यालयीन अभ्यास चालू होता. एकदां वर्गात त्यांचे प्राध्यापक विल्यम हेस्की यांनीं कलकत्त्याजवळच दक्षिणेश्वर येथें रहाणारे थोर महान योगी साधु पुरुष श्री सद्‌गुरु रामकृष्ण परमहंस यांच्या तद्रुपावस्थेचें वर्णन केलें आणि केवळ या वर्णनामुळें भारावून जाऊन ते परमहंसांकडे इतके आकर्षिले गेले कीं तावडतोब त्यांच्या भेटीची तळमळ त्यांना लागली व १८८१ मध्यें त्यांना सद्‌गुरु श्री रामकृष्ण परमहंस यांच्या भेटीचा परम लाभ होऊन परमानंद झाला. दोन अतिपवित्र आत्म्यांचा असा संगम झाला. रामकृष्णांनी अंतर्ज्ञानांनीं नरेंद्रास ओळखलें. रामकृष्णांनाहि नरेंद्रांनीं वेड लावलें. परमहंस म्हणजे नरेंद्रांचे केवळ गुरूच नव्हते तर ते त्यांचे बंधू, मित्र, वडील, आई, सर्वस्व होते. नरेंद्रांची पांच वर्षें त्यांच्या सहवासांत केव्हांच निघून गेलीं. त्या सहवासांत विचार, कल्पना, अनुभव या सर्वांचें विपदीकरण होऊन शरीरें दोन पण जीव एक अशी स्थिती झाली. अखेर दोन शरीरांपैकीं एक शरीर सुकलें, जीर्ण झालें, गळून गेलें व तरुण अशा दुसऱ्या देहांत सर्वजीव समाविष्ट झाला. श्रावण वद्य २ शके १८०८ संवत् १९४२ सोमवार ता. १६ ऑगस्ट १८८६ रोजीं श्री रामकृष्ण समाधिस्थ झाले.

रामकृष्णांच्या मृत्यूनंतर तीन वर्षें नरेंद्रांनीं वडानगर येथल्या परमहंसांच्या आश्रमांत साधनेंत घालविलीं. परमहंसांनीं ज्यांचेमध्यें जीवन उत्पन्न केलें त्यांची योग्य ती जोपासना करून तो जीवनप्रवाह उचित मार्गावर गंगौघाप्रमाणें एकत्र वहाता ठेवण्याचें कार्य त्यांनीं केलें. परमहंसांच्या महानिर्वाणानंतर त्यांच्या नरेंद्रांसहित २९ शिष्यांनीं एकत्र जमून असा निश्चय ठरविला कीं आपणहि यापुढें संसारांत न पडता विरक्त होऊन संन्यास घ्यायचा व सर्वत्र संचार करून आपले गुरु जे परमहंस त्यांच्या मताचा अर्थात् वैदिक धर्माचा जनतेंत होईल तितका प्रसार करायचा असा सर्वांनी संकल्प सोडला व रामकृष्णांच्या पादुका मस्तकावर धारण करून परमहंसांनीं अंगिकारलेलें धर्मोपदेशकांचें कार्य त्यांनीं सुरू केलें. नरेंद्रांनीं भगवी वस्त्रें धारण केलीं व संन्यासाची मनोमय प्रतिज्ञा केली.

१८९० ते १८९३ च्या मध्यापर्यंत नरेंद्रांचा काल भारत–भ्रमणामध्यें गेला. हिमालयापासून तो थेट रामेश्वरापर्यंत त्यांनीं सर्व ठिकाणांना भेटी दिल्या. बहुतेक सर्व थोर संतांच्या गांठीभेटी घेतल्या. गाझीपूर येथें तर ते कांहीं काल पव्हारीबाबा नामक एका साधु पुरुषाकडे खूप आकर्षिले गेले होते परंतु पुढें त्यांचा मोह त्यांनीं सोडला.

१८९३च्या मध्यापर्यंत भारत–भ्रमण करून नरेंद्र वयाच्या तिसाव्या वर्षी अमेरिकेस जागतिक धर्म परिषदेस हजर रहाण्यासाठीं म्हणून गेले. जाण्याच्या आदल्या दिवशीं सायंकाळीं खेत्रीच्या महाराजांच्या आग्रहावरून त्यांनीं सर्वांस आनंददायक असे 'विवेकानंद' हें नांव धारण केलें.

ता. ११ सप्टेंबर १८९३ रोजीं शिकागो शहरीं भरलेल्या सर्वधर्म परिषदेस स्वामी विवेकानंद हजर राहिले. त्यांनीं तिथें केलेलें भाषण जगाच्या इतिहासांत नोंदलें गेलें आहे. त्यावेळचा तो प्रसंग असा होता.

...पान ५३ वर



















अनुक्रमणिका

*द्रौपदीच्या उन्नत उरोभागांतून नारळाची एक करवंटी फटकन् बाहेर उडाली. दरम्यान वस्त्रहरण चालूच होतें. आपण किती वस्त्रें फेडलीं हें मोजायला दुःशासन विसरला आणि..................!*

*श्री.* **जयवंत दळवी** *यांच्या चालू विनोद–मालेंतलें आणखी एक हास्यस्फोटक प्रकरण—*




जिवाचें घराणेंच दशावतारी.

त्यामुळें साहजिकच दशावतारी नाटकें करणें आणि आसपासच्या गांवचीं दशावतारी नाटकें पाहून त्यावर आपली जाणकार मतें देणें हें त्याचें पिढीजात काम होतें. **मोचेमाडकर** दशावतारी मुद्दाम येत असत आणि वर्षांतून एखाद्या रात्रीं आमच्या गांवांत चांगलेंसें आख्यान लावीत असत. जिवा त्यांची सर्व सोय तर करून द्यायचाच. पण प्रत्यक्ष नाटक चालू असतांना देवळांतल्या सज्ज्यांत एका खांबाला टेकून उभा असायचा. कानावरल्या भरघोस झुलपांत खुपसून ठेवलेली अणकुच्चीदार कांडी उचलून दांत कोरीत तो गंभीरपणें उभा असायचा. खरें म्हणजे नाटक पहाण्यासाठीं तो उभा रहात नसे. परगांवच्या नवीन नाटक्यांना धीर देणारा अनुभवी दशावतारी म्हणुन तो तेथें उभा रहायचा. नाटकांतली घनघोर लढाई बघून किंवा शंखासुरानें टोकलेली डरकाळी ऐकून तो बाजूला जायचा आणि देवळाच्या सोप्यावर पडून रहायचा. क्वचित् अडचण असली तर गळ्यांत मृदंग अडकवूनहि तो उभा रहायचा.

रात्रीं झालेल्या नाटकावर दुसरे दिवशीं गांवांत चर्चा सुरू झाली कीं तो चारचौघांसमोर आपली मुरब्बी मतें द्यायचा.

'वाटललां तितक्यां आख्यान वाईट नाय. पण मेल्यांक लढाई मातर बरी जमना नाय!'

हातांत तलवारी घेऊन पार्टी बऱ्यापैकीं नाचले नाहींत, एवढीच त्याची तक्रार असायची.

'बाकी आख्यान जमलां बरां. पण रात्रीं दोन वाजतांच मेल्यानीं आवरलां. कोंबडो तरी ओरडूक होयो होतो!'

पहांटे कोंबडा आरवेपर्यंत नाटक चाललें नाहीं, प्रेक्षक पुरेसे जागले नाहींत एवढीच त्याची टीका असायची.

'शंखासुराच्या पार्टीक आवाजच नाय!'

शंखासुराची डरकाळी पुरेशी झणझणीत झाली नाहीं एवढीच उणीव!

असलीं दिसायला किरकोळ, पण त्याच्या मतें अस्सल अनुभवी मतें देत तो गांवभर हिंडायचा. त्याचीं सारीं मतें ही अधिकारी मतें आहेत असें गृहित धरून सारे गांवकरी गंभीर मुद्रेनें तीं ऐकून घेत असत. नाटकावर मतें देण्याचा आपल्या एवढा दुसऱ्या कोणाला अधिकार नाहीं असें जिवाला प्रामाणिकपणें वाटायचें. इतकेंच नव्हे तर कोणी तशीं जादा शहाणपणानें मतें दिलीं तर त्याचा चेहरा गोरामोरा व्हायचा. ही आपल्या हक्कांवर गदा आहे असें त्याला वाटायचें. 'तुकां समजता नाय तर बोलूं नको!' असें ताडकन् सांगून तो टीकाकाराचें तोंड तडकाफडकी बंद करून टाकायचा.

पण खुद्द आमच्या गांवांतच जिवाला प्रतिस्पर्धी निर्माण होत होता.

नाटकावर जिवापेक्षां निराळीं मतें देणारा, आणि तीहि नवीन दृष्टिकोनांतून मतें देणारा एक कलावंत (जिवाच्या मतें फुकट फौजदार!) हळूहळू उदयाला येत होता.

अनुक्रमणिका

तो म्हणजे दादू गुरव !

खवळनाथाच्या देवळांत देवाची पूजा करणें, प्रसाद लावणें, गाऱ्हाणें घालणें, तीर्थ–अंगारा देणें हीं त्याचीं नित्याचीं कामें. त्यासाठीं त्याला देवस्थानांतून पगार मिळायचा. शिवाय देवाला रोज भात–वरणाचा प्रसाद दाखवण्यासाठीं तांदुळ आणि धान्यहि मिळायचें. त्यावर देवापेक्षां त्याचाच उदरनिर्वाह व्हायचा.

पण तेवढ्यावरच त्याचें समाधान नव्हतें.

किर्लोस्कर, देवल, खाडिलकर वगैरेंचीं नाटकें जमा करून त्यानें तीं पाठ केलीं होतीं. त्या प्रत्येक नाटकांत काय कमी आहे हेंहि तो कुणी ऐकणारा भेटला तर वेळेची पर्वा न करतां सांगत बसायचा. खाडिलकरांच्या द्रौपदी नाटकांत वस्त्रहरणाच्यावेळीं किती वस्त्रें हरण करायचीं हें लिहिलेलें नाहीं अशी एक उणीव त्यानें माझ्या नजरेस आणली होती. आणि त्या संबंधांत त्यानें थेट खाडिलकरांनाहि एक कार्ड टाकलें होतें. पण खाडिलकरांचें उत्तर न आल्यामुळें खाडिलकरांना उत्तर देणेंच कठीण जातें आहे असेंहि तो एकदां मला म्हणाला होता.

द्रौपदीचीं किमान नऊ वस्त्रें तरी सोडलीं पाहिजेत. त्याशिवाय द्रौपदी वस्त्रहरणाच्या आख्यानाचा रसपरिपोषच होणें शक्य नाहीं असें त्याचें प्रामाणिक मत होतें. पण नऊच वस्त्रें कां ? –बारा वस्त्रें कां नाहींत ? – असा प्रश्न त्याला कुणी कधीं खुलाशासाठीं विचारला नाहीं. कदाचित् दादू गुरवांचीं मतें आणि त्याची नाट्य-चर्चा गंभीरपणें घ्यायचीच नाहीं असें लोकांनीं ठरविलें असावें. किंवा जिवा दशावताऱ्याचा प्रभावच गांवकऱ्यांवर अधिक असावा.

दादूनें केलेल्या नाट्य-चर्चेची जिवानहि कधीं किरकिर केली नाहीं. उलट त्यानें झेपेल तेथें दादूची टिंगलच अधिक केली.

'देवाची पूजा करूची सोडून, तीर्थ-प्रसाद दिवचो सोडून ह्येका नाटकाची भानगड सांगलीसा कोणी ? असें म्हणत तो दातांत अडकलेला सुपारीचा कण थू थू करीत थुंकायचा.

'देवळांत बसून हंबरडो फोडलो म्हणून काय संगीत जमतां ?' दादूनें आळवलेले नाट्य-संगीताचे आलाप ऐकून जिवा आपलें मत द्यायचा.

'मेल्याक धड येना नाय कनवट आवळूक. तो नाटकांत लढाई काय मारतलो ? ' दादूच्या कमरेपर्यंत घसरणाऱ्या पंच्याकडे बघत तो फाटकन बोलून मोकळा व्हायचा.

पण दादूनें दाद दिली नाहीं.

कधीं वाटलेंच तर 'वाऱ्यानें भिंतीवरचा नकाशा फडफडला म्हणून कांहीं धरणीकंप होत नाहीं !' असें एखादें तोंडपाठ केलेलें वाक्य फेकून दादू आपली सुटका करून घ्यायचा. पण कांहीं तरी विशेष करून दाखवण्याची त्याची प्रतिज्ञा होती. एक नव्या पद्धतीचें नाटक बसवून जिवासकट सर्वांना चकित करून सोडावें असा त्याचा विचार होता. आणि म्हणून तो एका नाटकाच्याहि मागे होता.

लिहितो आहे–लिहितो आहे असें सर्वांना सांगत शेवटीं त्यानें 'संगीत द्रौपदी वस्त्रहरण' हें नाटक लिहून पुरें केलें इतकेंच नव्हे तर



'उद्यां सकाळपर्यंत मिशी हजर कर नाय तर परिणाम भयंकर होतले' असें उत्कट अभिनयानें सांगणारा घरंदाज दशावतारी जिवा.

जिवाच्या नाकावर टिच्चून त्यानें देवळाच्या सज्ज्यांत तालमी घेण्याचें ठरवून टाकलें. त्याबरोबर जिवा खाडकन् जागा झाला. आपल्या 'खवळनाथ प्रासादिक दशावतारी मंडळीं' तल्या सगळ्या पार्टींना त्यानें सक्त इशारा दिला. 'दादूच्या नाटकांत काम केल्यात तर गांडीर लाथ घालीन एकेकाच्या' असें बजावून त्यानें आपल्या परीनें कडेकोट बंदोबस्त केला.

पण दादूहि डरला नाहीं. त्यानें इकडून तिकडून चार झिलगे जमविले. द्रौपदीचें काम खुद्द आपल्याच शिरावर घेतलें. आणि तालमी सुरू केल्या. रात्रीं त्याच्या तालमी सुरू झाल्या म्हणजे जिवा देवदर्शनाच्या निमित्तानें मुद्दाम देवळांत फेरी मारून जायचा. तिरकस नजरेनें दादूवर कटाक्ष फेकायचा. स्वतःशींच हंसायचा आणि दांत कोरीत थू थू करीत पुढें जायचा. वाटेंत कोणी भेटला तर दादूच्या कानावर जावें म्हणून म्हणायचा, 'आधीं शेंडी कापून माथ्यावर केसाचीं झुलपां तरी वाढंय म्हणूचां !' म्हणजे डोक्यावर भरगच्च झिंज्या असल्याशिवाय तो नाटकी होऊंच शकणार नाहीं, नाटकी म्हटला म्हणजे गळ्यापर्यंत केस लोंबलेच पाहिजेत हें त्याचें अनुभवी मत.

अर्थात् तें दादूला शक्य नव्हतें. दादूचा नाइलाज होता. गुरव म्हटला म्हणजे गळ्यांत जाणवें, कपाळीं शुभ्र गंधाचा टिळा, टाळूवर लांबलचक शेंडी एवढी सामुग्री तर हवीच. आणि द्रौपदीचें काम करणाऱ्याला झुलपें काय आणि शेंडी काय ?—शेवटीं बायकी केसाचा टोप हा हवाच.

तालमी नीट जमल्या तसा दादू एका रात्रीं कंदील घेऊन आमच्या घरीं आला आणि आबांना हात जोडून म्हणाला, 'द्रौपदी वस्त्र हरण नाटक बसयलासा. धन्यानु, तुमचो आशीर्वाद होयो !'

माणसाला आशीर्वाद द्यायचा हें तर आबांचें आवडीचें काम. तसें केल्यानें गांवांतले लोक सुखी करण्यास आपण मदत करतां असें त्यांना वाटायचें. त्यांनीं लगेच वरांतून एक नारळ आणवला आणि तो दादूच्या हातीं ठेवला. दादूनें त्यांच्या चरणावर लोटांगण घातलें.

'म्हाराक बाईच सांगूक होया ढोल वाजव म्हणून—'

'सांग रगल्या म्हाराक गांवभर दवंडी दी म्हणून !' आबांनीं आज्ञा दिली.

'धन्यानु, तुमी सवतां येवंक होयां. तुमाच्या पायाची धूळ पडल्याशिवाय पार्टी उभे रवचे नाय !' दादूनें आणखी एक गळ घातली.

'माका आतांशीं जागराणा जमणांत नाय. पण आमचो आपू मात्र येत. '

'चलात. तुमच्या घराण्याचो कोणी तरी होयो. '

हें सारें झाल्यावर दादूनें मूळ मुद्याला हात घातला.

तो मुख्यतः आला होता जिवाच्या दशावतारी मंडळाचा पेटारा मागायला. जरीचे, रेशमी अंगरखे, लुगडीं, फेटे, मुकुट, फाल्साचे दागिने, केसाचे टोप, मिशा, रंग, तलवारी सर्वसाधारणपणें पौराणिक नाटकांना लागणारी



अनुक्रमणिका

जय्यत सामुग्री त्या पेटाऱ्यांत होती. जिवानें मोठ्या कसोशीनें आणि मेहनतीनें ती सामुग्री जमवली होती. त्यांत वेळोवेळीं भर घातली होती. हा पेटारा मिळाला नाहीं तर संगीत द्रौपदी वस्त्रहरण उभें राहणें शक्य नव्हतें. आणि तालमी सुरू झाल्यापासून जिवानें जी शंखासुरी मुद्रा धारण केली होती ती पहातां तो सहज मागून पेटारा देईल अशी शक्यता नव्हती. म्हणून त्याला जिवावर आबांच्या शब्दांचें दडपण आणायचें होतें.

'सांग जिवाक पेटारो दी म्हणून. मी सांगलेय म्हणून सांग.'

तेवढ्यांत खळ्यांत पावलांचा आवाज आला. अंधार होता. कोण तें कळलें नाहीं. म्हणून आबांनीं विचारलें, 'कोण रे ?'

'कोण नाय. मी तो जिवा !'

पेटाऱ्यासाठीं दादू थेट आबाकडे आला आहे हें कळतांच रोखठोक मोडता घालण्यासाठीं दांत कोरीत जिवा तेथें हजर झाला होता.

दगडी खांबाला पाठीची व्यंकटी टेकून बसलेला दादू जिवाला दिसला नाहीं.

'धन्यानु, इकडे दादू गुरव आयलेलो ?' जिवानें चौकशी केली.

'हो काय बसलोसा–' आबा म्हणाले.

जिवाला समोरासमोर पहातांच दादू गोरामोरा होऊन उभा राहिला.

पण जिवानें पर्वा केली नाहीं. काजूची दारू एकदम चढावी तसें त्याला झालें. दादूला पहातांच हातवारे करीत तो शिव्या देऊं लागला. आपल्या पुढ्यात कुणी कुणाला शिव्या दिलेल्या आबांना खपत नसे. तें जिवाला माहीत नव्हतें असें नव्हें. पण रागाच्या भरांत तो तें विसरला. पण दादू मोठा वस्ताद. त्याला तें माहीत होतें. तो गरीबासारखा गप्प उभा राहिला. पण जिवा तेथें आबा आहेत हें विसरून तोंड उघडून ताडताड दादूला शिव्या देऊं लागला. तें ऐकून दादू ऐवजी आबांचाच पारा एकदम चढला. बसल्या जागेवरून ते वर उडल्यासारखे उठले आणि तिरासारखे जिवाच्या अंगावर धांवले. काय घडतें आहे हें त्याला कळण्याआधींच थपडेचा काडकन् आवाज झाला आणि जिवाचें मुस्काट तिथल्या तिथें फुटलें. फर झडून गेलेली त्याची जिरेटोपी लोळत जाऊन अंगणांत पडली.

हें सारें इतकें अनपेक्षितपणें झालें कीं जिवा एकदम मर्दच झाला आणि पुढली सारी बातचीत जागच्या जागीं कोलमडून पडली.



बरें झालें देवा
झाली दारूबंदी
नव्हते तेही आता
झाले पुरे छंदी

☆☆☆☆☆☆☆☆☆☆☆☆☆☆☆☆☆☆☆☆☆☆

'उद्यां सकाळीं पेटारो दादूच्या हवालीं कर.' आबांनीं हुकूम सोडला.

'तुमच्या म्हणण्यापलिकडे मी नाय. तुमी म्हणतात तर दितंय पेटारो.' असें म्हणत अंगणांतली टोपी उचलत जिवानें पाय काढता घेतला. पण जातां जातां खालच्या आवाजांत त्यानें दादूला तंबीहि दिली. 'पेटाऱ्यांतली एक वस्तु चुकली तर कमरेवरचो पंचो सोडून घेतलेंय. ध्यानांत ठेय. एक मिशी सांडली तर तुझी शेंडी गेली म्हणून समज. हां ! भडवो नाटकां करतां.'

दुसरे दिवशीं सकाळीं माडी पिण्यासाठीं दादूनें दिलेली चवली कनवटीला लावून रगल्या महारानें गांवभर ढोल बडवून दवंडी पिटली.

'आज रातीं श्रीदेव रवळनाथाच्या देवळांत दादू गुरवाचा वस्त्रहरण नाटक आसा. सगळ्यांनीं येवंचां हो ऽऽ !'

ती दवंडी ऐकून 'दादू गुरवाचां वस्त्रहरण' असें सर्वांना सांगत जिवाही स्वतःला विसरून गांवभर फिरला. 'द्रौपदीचा वस्त्रहरण न्हय– दादू गुरवाचां वस्त्रहरण' असाहि विनोद करीत तो स्वतःशींच हसला.

दिवस मावळल्यापासून गांवकऱ्यांची रीघ सारखी देवळाकडे लागली. म्हाताऱ्या-कोताऱ्या-पोरेंबाळें, तरणें-म्हातारे खांद्यावर पटकुऱ्या टाकून, मुंडाशीं आवळून, गळ्याभोंवती रुमाल फिरवून, साटवणींतले कपडे चढवून देवळाच्या दिशेनें निघाले. हातांत जळत्या चुडत्या घेऊन, मिणमिणते कंदील घेऊन सारे पाय देवळाच्या दिशेनें लागले. हां हां म्हणतां नऊ वाजेपर्यंत देवळाच्या मंडपांत तुफान गर्दी जमली. मी देवळांत येतांच देवासमोर उभा राहिलों. आम्हीं सर्वांनी रवळनाथाला गाऱ्हाणें घातलें. दादूच्या नाटकाचा प्रयोग बरा होऊं दे म्हणजे दादू पावशेर साखर व पांच केळीं देईल असें सांगितलें. मग दादूनें नारळ फोडला. सर्वांना खोबरें वाटलें आणि रंगसफेतीसाठीं तो घाईघाईनें निघून गेला. आपलें नाटक पहाण्यासाठीं तमाम लोक खेंचून जमले आहेत हें पाहून त्याच्या अंगावर मांस चढलें होतें. मन उत्साहित झालें होतें.

लोकहि नाटक पहायला उत्सुक होते. नाटकाच्या नांवापासून त्यांना सारें कांहीं नवीन नवीन वाटत होतें. बांकडे रचून तयार केलेलें स्टेज, पडदे, पडद्यापुढें बसलेले पेटीवाले आणि तबलजी सारें दृश्यच नवीन आणि उत्सुकता वाढविणारें होतें.

सुमारें दहा-साडेदहाला रवळनाथाच्या गाभाऱ्यांतली आरतीच्यावेळीं वाजवायची घंटा वाजली. पहिली घंटा वाजली. दुसरी घंटा झाली. तिसरी घंटा झाली. या घंटा मधून मधून कशासाठीं वाजत होत्या हें कुणालाहि माहीत नव्हतें. या घंटीचा आणि नाटक सुरू होण्याचा कांहीं संबंध होता याचीहि कुणाला कल्पना नव्हती. त्यामुळें तिसऱ्या घंटेबरोबर पडदा वर जातांच सर्वांना आश्चर्य वाटलें. अखंडपणें चालू असलेला गोंगाट एकदम भुईसपाट झाला. अधून मधून पोरें रडत होतीं आणि त्यांच्यावर आयाबाया खेंकसत होत्या.

नारदाचा वेष करून दादू गुरव आला आणि बराच वेळ त्यानें एक लांबलचक ईशस्तवन आळविलें. गळ्यांत तंबोरा होता आणि हातांत चिपळ्या होत्या. डाव्या हातानें चिपळ्या आणि उजव्या हातानें तंबोरा एकाच वेळीं वाजवणें दादूला जमत नव्हतें. त्यामुळें मधून मधून चिपळ्या आणि मधून मधून तंबोरा, आलटून पालटून वाजवीत तो गाणें गात होता. तसें पाहिलें तर दादूपाशीं गोड गळ्याची देणगीच नव्हती. पण गायनासाठीं गोड गळ्याची देणगी लागते याची दादूलाच कल्पना नव्हती. गाऊन गाऊन संवयीनें गाणें जमतें असें त्याचें म्हणणें होतें. चांभार जसा चामडें कमावतो तसा आवाज कमवायचा असतो असें खुद्द दादूच म्हणायाचा. ईशस्तवनाचें गाणें त्याला मुळींच जमत नव्हतें. तालमीचीं जागरणें

होऊन त्याचा घसा मुळांत बसला होता. त्यांत त्यानें आवाजच वरच्या पट्टींत लावला. त्यामुळें वर वर चढणाऱ्या त्याच्या हाताबरोबर आवाज वर गेला कीं आवाज गायब होऊन फक्त तोंडच उघडें रहायचें. मध्येंच आवाज पिचून कोटिंगचा तागा टरकवल्यासारखा आवाज यायचा. यामुळें पुढल्या संगीताचे दादू काय करणार आहे अशी चिंता वाटत होती. पण त्याचा अद्याप आवाज सुटलेला नाहीं, जसजसा तो गात जाईल, तसतसा त्याचा आवाज लागेल असें दादूचे चहाते लोक म्हणत होते.

नाहीं म्हणायला दादूचा आवाज स्टेजवरून प्रेक्षकांच्या कानांत निर्भेळपणें जाऊं नये म्हणून तबलजी सर्वप्रकारें कोशीस करीत होता. बाल पोरांच्या टाळक्यांवर मारक्या मास्तरानें टपल्या माराव्या तसा तो तबला बडवीत होता.

अखेर गाणें संपवून दादू आंत जातांच दादूच्या गाण्यावर प्रतिक्रिया होण्याऐवजीं दादू डब्बल पार्ट करणार याच गोष्टीचें कौतुक होऊं लागलें. नारद आणि द्रौपदी अशी डब्बल कामें दादू करणार याच गोष्टीची सकौतुक चर्चा होऊं लागली. ही चर्चा प्रेक्षकांत चालू असतांनाच गळ्याभोंवतालचा आपला मफलर सांभाळीत जिवा लगबगीनें माझ्याकडे आला आणि आपल्या तोंडावर हाताची झांपड ठेवून माझ्या कानांत गडबडीनें पुटपुटला, 'धन्यानु, अपशकुन झालो!'

'काय झालां?'

'गणपतीचो मुखवटो दाखवच्या आधींच मेल्या दादून् नाटक सुरू केलां. आमची जुनी रीतभात मोडली.'

प्रत्येक शब्दागणित जिवाच्या तोंडून पान आणि माडी यांचा उग्र दर्प भपकारून माझ्या नाकावर पडतांच मी कंटाळून अस्वस्थ झालों, आणि त्याला घालवून देण्यासाठीं मी म्हटलें, 'जाऊं दे रे! देवाचीच घंटा वाजली या? नाटक सुरू झालांसा. तूं मोडतो घालूं नको!' प्रत्येक शब्द मी डाफरून उच्चारतांच जिवानें पाय मागें घेतला आणि त्या गर्दीतून तो नाहींसा झाला.

गर्दीतून वाट काढणें त्याला मुश्किलीचें झालें होतें. तरीहि 'दादूचां नाटक बघूंक येतले कोण? गर्दी आसां रंय?' असें बड-बडत खेंचून जमलेल्या गर्दीतून त्यानें कशी-बशी वाट काढली, आणि तिथून जो निसटला तो पुनः दिसला नाहीं.

नाटक अखंडपणें सुरू राहिलें.

'आये, शंखासूर कधीं येतलो?' शंखासुराला बघण्यासाठीं आलेलीं पोरें जांभया देत आपापल्या आयांना एकच प्रश्न विचारत राहिलीं.

'मेल्या गप्प रव! तो दादू गुरव गाणां म्हणतां बघ!' असें म्हणत कंटाळलेल्या आयाहि चिडचिडत राहिल्या.

त्यानंतर मलाहि झोप लागली खुर्चीला पाटीमागें डोकें टेकून मी गाढ झोपलों.

तेवढ्यांत अकस्मात् आरडाओरड झाली. त्या आवाजानें मला जाग आली. पहातों तो गर्दीतून वाट काढीत, मोठमोठ्यानें ओरडत, आपली गदा नाचवीत, दुःशासन स्वतःलाच स्टेजकडे रेटत होता. त्याचें लक्ष स्टेजवरल्या द्रौपदीकडे असल्यामुळें दुःशासनाचे पाय कोणाच्या हातावर, पायावर, झोपलेल्यांच्या पोटावर पडत होते. त्यामुळें दुःशासनाच्या तावडींत सांपडलेल्या प्रेक्षकांत आरडाओरड आणि रडारड चालू होती. दुःशासनाच्या तडाख्यांतून सुटलेले प्रेक्षक इतरांना गप्प करूं लागले.

'गप्प रवा, गप्प रवा! दुःशासन आयलो.'

'पोरांना दुःशासन म्हणजे कोण तें माहीत नव्हतें.

'हो बघा शंखासूर आयलो!' असें पोरें ओरडूं लागलीं.

सर्वांच्या डोळ्यावरून झोप उडाली.

दुःशासनानें स्वतःचें जबरदस्त सामर्थ्य दाखविण्यासाठीं जमिनीवरून धाडकन् स्टेजवर उडी मारली. पण उडी मारतां मारतांच पाय अडकून त्याच्या धोतराची कांस सुटली आणि प्रेक्षकांतून एकदम हास्याची लाट उसळली. सर्वांसमक्ष आणि पुनः त्या स्टेजवर कांस घालण्याच्या धडपडींत दुःशासनानें बरीचशीं वाक्यें खाऊन टाकलीं. त्यामुळें दादू गुरवाचा चेहरा वस्त्रहरण झाल्यासारखा दिसू लागला. द्रौपदीसारखा चेहरा दिसण्या-ऐवजीं लेखकासारखा दिसूं लागला. आपलीं चांगलीं वाक्यें दुःशासनानें अशीं खाऊन टाकावींत हें दादूला रुचलें नाहीं. म्हणून बाजूला तोंड करून तो चुकलेलीं वाक्यें सांगण्याचा प्रयत्न करूं लागला.

दुःशासनाच्या धोतराची कांस सुटल्यामुळें तो आधींच ओशाळल्यासारखा झाला होता. त्यांत खुद्द द्रौपदीनेंच त्याचीं चुकलेलीं वाक्यें त्याला स्टेजवर पुनः सांगितलीं. त्यामुळें तो अधिकच ओशाळा दिसूं लागला. असा हा ओशाळगत दुःशासन द्रौपदीच्या वस्त्राला हात घालील कीं नाहीं अशीहि अनेकांना शंका आली.

पण सुदैवानें ती शंका खोटी ठरली. कारण दुःशासनाचें काम करणारा आडदांड दादुल्या होता. नेहमी पंचांत वावरणारा हा माणूस दुःशासन होताच पायघोळ धोतर नेसायला मिळालें त्यामुळें त्याचा अंदाज चुकला. कमरेला पंचाच

आहे अशा समजुतीनें त्यानें उडी मारली आणि पायघोळ धोतर पायांत आलें. बाकी तसा तो डरणारा पुरुष नव्हता. हाच दादुल्या मला लहानपणीं दांडगाईनें उचलून शाळेंत नेऊन बसवायचा. त्यामुळें सहाजिकच माझ्या मनांत जुनी आठवण जागी झाली आणि दादुल्याचा प्रारंभीच मुखभंग झाला हें पाहून मला सूक्ष्मसा आनंद झाला.

दादुल्या निगरगट्ट होता. लोक हंसले ते आपल्या कामालाच हंसलें असा त्याचा समज झाला असावा. कारण कासोटा घट्ट बसतांच तो एकदम फार्मांत आला. त्यानें गरगरा गदा फिरवली. त्यामुळें हा द्रौपदीचें वस्त्रहरण करणार कीं गदा मारून कपाळमोक्ष करणार अशी मला शंका आली. तेवढ्यांत तो कडाडून ओरडला, 'मी तुझें लुगडें सोडणार. सोडणार नाहीं. द्रोपदे, मी तुझें लुगडें सोडणार. हवा तेवढा धांवा कर!' गदा उचलून त्या आंखूड स्टेज-वर तो पुनः एकदां शंखासुरासारखा थयथय नाचला. दुःशासनाचें काम करतांना त्याच्या नजरेसमोर जिवाचा शंखासूरच होता. नाच नाच नाचला आणि मग दमून भागून श्वास सोडीत गदेचा आधार घेऊन गप्प उभा राहिला.

तेवढ्यांत द्रौपदीनें गाणें म्हणत धांवा सुरू केला.

"कृष्णा धांवरे। धांवून ये इकडे।
नराधम सोडतो लुगडें॥'

त्या गाण्यांतल्या फक्त या दोनच ओळी मला आज आठवतात.

दादू गुरव आपल्या रसपरिपोषाच्या सिद्धांता-नुसार बहुधा नऊ–दहा लुगडीं नेसून आला होता. त्यामुळें तो द्रौपदीसारखा दिसण्याऐवजीं एखाद्या गलेलठ्ठ शेठाणीसारखा दिसत होता. बराच वेळ इकडे तिकडे धांवत, पुरुषी हातवारे करीत, तेंच गाणें पुनः आळवीत दादू खूप नाचला. त्यानें पराकाष्ठेचा धांवा केला. त्यामुळें दुःशासनाला संधि मिळणार कीं नाहीं, दुःशासनानें वस्त्रें सोडण्याआधींच दादूचीं वस्त्रें सुटणार कीं काय अशी भीती वाटत होती. दादुल्यालाहि तशी भीति वाटली असावी. कारण अधिक वेळ न गमावतां त्यानें आपली गदा बाजूला टेवली आणि आपोआप द्रौपदीचीं वस्त्रें सुटण्याआधींच तिच्या अंगावर हात टाकला. पदर पकडला आणि आपलें दादूशींच जुनें हाडवैर असल्यासारखा त्यानें एकदम पदर खेचला. त्या धक्क्यानें आधीं ठरल्याप्रमाणें रसपरिपोषासाठीं दादू ताडकन आडवा पडला. गडबडा लोळूं लागला. 'कृष्णा, कृष्णा अरे तूं आहेस कुठें?' असें लोळतां लोळतां ओरडूं लागला. एक लुगडें सोडून दुसऱ्या पदराला हात घालीपर्यंत 'नराधम सोडतो लुगडें। कृष्णा धावून ये इकडे।' एवढ्या दोन ओळी गाऊं लागला.

लुगडीं सोडतां दादुल्याला इतका चेव आला कीं त्याचा चेहरा उग्र तुफानी दिसूं लागला. कापडाचा मोठा तागा सोडावा तसा तो लुगडीं सोडूं लागला. धडाधड आवाज येऊं लागला. इतका कीं कोपऱ्यांत बसलेली दादू गुरवाची बायको एकदम उभी राहून ओरडली, 'अरे दादुल्या, मेल्या जरा हळूं आपटले रे ते!'



'दिसूंक शंकासूर खरो; पण मेल्याक आवाजच नाय......'

इति जिवा.

त्या गडबडींत द्रौपदीच्या उन्नत उरोभागांतून नारळाची एक करवंटी फटकन् बाहेर उडाली. आणि चोळीचा तेवढा भाग रिकामा होऊन चुरगळून गेला. गडगडत खालीं गेलेली करवंटी दादूला परत उपयोगी पडेल या आशेनें पुढें बसलेल्या पोरांनीं पुनः वर फेकली. दरम्यान वस्त्रहरण अखंडपणें चालूंच होतें. चोळीची एक बाजू रिकामी होतांच दुसरीहि करवंटी घरंगळली आणि द्रौपदीचें ऊर लुकड्या म्हातारीसारखें सपाट आणि लवथवतें दिसूं लागलें.

पण दादुल्यानें मात्र दम मोडला नाहीं. त्याच्या अंगांत खरोखरच दुःशासन संचारला होता.

एवढ्यांत कृष्णानें आलें पाहिजे आणि हें प्रकरण मिटवलें पाहिजे असें माझ्यासकट सर्वांना वाटूं लागलें. नाहींतर द्रौपदीच्या कपाळा-वर टेंगळें येतील अशी आम्हांला भिती वाटूं लागली.

या साऱ्या गडबडींत किती वस्त्रें सोडलीं हें मोजायला, मला वाटतें, दादुल्या विसरला. आणि वस्त्रहरणाचें एकमेव काम तो कसोसीनें पार पाडीत असतांना दादूनें मध्येंच उभा राहाण्याचा प्रयत्न केला आणि तें जमत नाहीं असें दिसतांच तो एकदम किंचाळून ओरडला, 'मेल्या थांब, मेल्या थांब!'

पण दादुल्याच्या अंगांत दुःशासनच संचा-रला होता.

त्यानें ताडकन् लुगडें ओढलें आणि द्रौपदी पुनः एकदां जमीनदोस्त झाली.

तें लुगडें पडद्यांत टाकून दुःशासन वळून पहातो तो–

दादूच्या अंगावर सोडण्यासारखें असें आणखी कांहीं नाहीं. रिकामी चोळी आणि कमरेला लंगोटी!

तेवढ्यांत आंतून कुणी तरी ढकलल्यामुळें धडपडत कृष्ण पुढें आला.

तो बेसावध असतांना घाईघाईनें त्याला कोणी तरी स्टेजवर ढकलल्यामुळें तो मुकुट घालायला विसरला होता. त्याची लांबलचक शेंडी गांठीसह लोंबत होती. स्टेजवर येतांच तो एकदम बावरला. हातांतली जळती विडी कुठें टाकावी हा प्रश्न पडून तो आणखी घाबरला. त्यानें ती विडी बाजूला फेकतांच पुढें बसलेल्या पोरांच्या अंगावर ती पडली आणि तीं द्वाड पोरें किंचाळून उठून उभी राहिलीं.

उघड्या बोडक्या दादूला पाहून आतां कुठला संवाद म्हणावे हें कृष्णाला आणि दुःशासनाला दोघांनाहि कळेनासें झालें. ते दोघेहि एकमेकांच्या तोंडाकडेच बघत राहिले. तेवढ्यांत दादूनें आपली अब्रू बचावण्यासाठीं पडद्यांत तरी पळावें. तो रागारागानें चडफडत तसाच पुढे आला आणि फाडकन् भगवान कृष्णाच्या मुस्कटांत देत ओरडला, 'भोसडीच्या, आतां कित्यांक? माझी लंगटी सोडूंक इलंय?', कृष्णाला एका थपडेसरशी गारद करून तो तात्काळ दादुल्याकडे वळला. 'भडव्या, तुका कितीदां सांगलां लुगडीं सोडतांना बरोबर मोज म्हणून?'







'असां काय ! मोजली बरोबर ! तूं एक लुगडा कमी नेसलंय त्येकां मी काय करूं ?' दुःशासनानें रदबदली केली.

'बोलं नको एक शब्द ! तरी बरां आंत लंगटी होती म्हणून !' नाहीं. म्हणायला लुगड्याच्या आंत लंगोटी होती यांतच दादू समाधान मानूं लागला.

पण त्याचा राग ओसरला नव्हता. मुठी आवळून तो दुःशासनाकडे पहात राहिला. तो आतां आपल्याहि कानपटांत देईल या भीतीनें दादुल्यानें गदा उचलली. त्यामुळें मारामारी होईल या भीतीनें मी धांवून स्टेजवर चढलों. प्रथम पडदा पाडला आणि संभाव्य मारामारी टाळली.

गोंधळून गलका करणाऱ्या प्रेक्षकांना घरीं पिटाळलें. दादूच्या अंगावर पंचा टाकला. सर्वांचे नाटकी कपडे उतरून घेतले आणि दोन–चार झिलगे जमवून कृष्णाला आणि दुःशासनाला सक्त संरक्षणाखालीं त्यांच्या घरीं पाठवलें.

हें सारें नाटक निस्तरून मी घरीं आलों तेव्हां आवा तोंड धूत होते.

त्यानंतर सात–आठ दिवस दादूच्या वस्त्र-हरणावरच गांवभर चर्चा चालू होती. हें दादू गुरवाचेंच वस्त्रहरण झालें असें सांगत, चेष्टा करीत जिवा गांवभर फिरत होता. या द्रौपदी वस्त्रहरणामुळें खराखुरा आनंद झाला होता तो त्या जिवाला !

पण तोहि तेवढ्या आनन्दावरच गप्प बसला नाहीं. दुसरें दिवशीं संध्याकाळीं तो दादूच्या घरीं गेला. दादूची बायको दादूच्या अंगाला रक्तचंदनाचा लेप लावीत होती. तरीहि जिवा द्रवला नाहीं. तावातावानें हातवारे करीत तो कडाडला, 'दादू, भडव्या, मी तुका असो सोडूचंय नाय. पेटाऱ्यांतली एक मिशी सांडलीसा. उद्यां सकाळपर्यंत मिशी हजर कर. नाय तर परिणाम भयंकर होतले !' कानावर हात ठेवून तो निघून गेला.

त्यानंतर दादू गुरवानें मिशी हजर केली नाही. तो तरी कुठून हजर करणार ? अंग चेपून निघाल्यामुळें त्याला आधीं जागचें हालणेंच मुष्किलीचें झालें होतें. आणि पेटाऱ्यांतली मिशी गेली कुठें तें कळणार कसें ? कुणाच्या खमीसाला, कुणाच्या पंचाला अडकून मिशी गेली असेल. कदाचित दुःशासन मिशीसकटच आपल्या घरीं गेला असेल. कुणी सांगावें ? कळणार कसें !

पण जिवानें मात्र वीटभर लांबीच्या मिशी-साठीं दादूची गय केली नाहीं. तिसऱ्या दिवशीं सकाळीं दवळाच्या सोप्यावरून दादू गुरव झोपून उठला आणि शेंडीला गाठ मारण्यासाठीं त्यानें डोक्यावर हात फिरवतांच त्याची शेंडी डोक्यावेगळी झाली होती हें त्याच्या लक्षांत आलें.

त्यानंतर वस्त्रहरणामुळें पडलेला चेहरा आणि जिवानें कापलेली शेंडी लोकांना दिसूं नये म्हणून दादू गुरव देवळाच्या काळोख्या गाभाऱ्याबाहेर कांहीं दिवस पडला नाहीं.

(क्रमशः)

*विडंबन या साहित्य प्रकरांत श्री.* **पद्माकर गोवईकर** *आज बिनीच्या सरदारांत मोडतात. हा रसरसीत लेख त्याचा पुरावा आहे. तो वाचतांना कांहीं घटिका वाचक निश्चित स्वत:ला विसरतील.*



# वाढवी महत्व वडिलांचे

वाण्याच्या तुक्यानें (संत तुकाराम असेंहि मतभेद आहेत) उपदेशपर अभंग बरेच लिहिलेत. अन्तरीं निर्मळ रहावें, परद्रव्य अंध असावें, साखरेसारखे सगळीकडून गोड असावे, परस्त्रीठायीं नपूंसक रहावें, इ. अ. प. ही लिस्ट आणखी वाढवली तर घोड्याच्या रेसच्या निकालासारखी ती वाढत जाईल आणि शेवटीं Also Ran सारखें 'हाहि' उपदेश तुकोबांनीं केलाय् असें सांगावें लागेल. त्यांच्या या अनेक उपदेशांबद्दल माझें फारसें दुमत नाहीं. तें सगळें ठीक आहे त्यांचें. पण शाहिराच्या अनेक सुंदर कवनांत, 'बापू गोखल्या संभाळ कासोटा, ताई तेलीण मारील सोटा' ही ओळ जशी कुरकुरत राहिली तशी एक ओळ हे महाराज एका अपघाती क्षणीं लिहून गेलेत ते घसरले तें इथें.

शांतिरूप नव्हे कुणाचा वाईट।
वाढवी महत्व वडिलांचे

माझा प्रामाणिक विरोध आहे तो या ओवीच्या उत्तरार्धाशीं. 'वाढवी महत्व वडिलांचें' या तुकाराम 'वाणी'च्या तेलकट उपदेशाबद्दल.

एकतर तुकोबांच्या मागें अभ्यासाचें लाटणें नसावें. ('लाटण्याचें काम' जिजाबाई करीत होती म्हणे) दुसरे त्यांच्या वडिलांनीं त्यांना सायकल शिकायला सांगितलें नसावें. अगर त्यांनीं ही उपदेश ओवी बोल्होबांच्या पश्चात् तरी लिहिली असावी. वस्तूची दुर्भिक्षता तिचें 'महत्व वाढवतें' असें अर्थशास्त्रच नाहीं कां सांगत?

'संत तुकाराम कालीन शिक्षण' यावर प्रबंध लिहिण्याचा माझा मानस नाहीं. मी कॉमर्ससाईडचा विद्यार्थी आहे. परंतु नम्रपणें मी इतकेंच सांगेन कीं, त्याकाळीं शिष्य गुरुकडून जे कांही घेत त्याला ठणठणीत विद्यार्जन असें म्हणत असत. संत रामदास युनिव्हर्सिटी असल्याचें माझ्या तरी कानीं नाहीं. त्याकाळीं शिक्षणाचें पीठ पाडत नसत.

संत रामदास विद्यापीठ
प्रोप्रा. कल्याणस्वामी

अशा शिक्षणाच्या गिरण्या तेव्हां नव्हत्या. विद्यापीठ हा समास षष्ठी तत्पुरुष या प्रकारानी सोडविल्यास मी काय म्हणतो तें कळावें. विद्येंत पीठ असा सप्तमी तत्पुरुष प्रकारानेंहि तो सोडविला तरी चालेल. विद्येंत पीठं कालवल्यामुळें एकूण शिक्षणाचें पिठलें करण्यांस स्त्रियांना कसा वाव मिळाला आहे तें यावरून लक्षांत यावें. तत्कालीन मठांतील शिष्य आणि शिष्या जें अध्ययन करीत त्याला सहशिक्षण म्हणत नसत. आणि सगळ्यांत महत्वाचें म्हणजे गुरू गुरूच असत आणि शिष्य शिष्यच असत. गुरू शिष्याना संथा देत. शिष्य गुरूंना देत नव्हते.

सध्याचा काळ समजावून घेण्याचा आहे. मास्तरांनी पोरांना, प्रोफेसर्सनी विद्यार्थ्यांना आणि पतीनें पत्नीला समजावून घ्यायचें. मास्तरांनीं डायरेक्ट 'मेथडच्या पद्धतीनें' कलिंगडाकडे बोट दाखवून 'हें काय आहे' असें पोरांना विचारलें, आणि पोरट्यानें 'तें डाळिंब आहे' असें सांगितलें तरी पोराला 'तें कलिंगड आहे' असेंच म्हणायचें आहे,



अनुक्रमणिका

हें मास्तरनें समजावून घ्यायचें. तसेंच आर ए टी रॅटचें स्पेलिंग विद्यार्थ्यानें आर ई टी 'रेट' असें लिहिलें तरी त्याला तें Rat असेंच लिहायचें होतें हें प्रोफेसरनें समजून घ्यायचें.

आज सर्वच क्षेत्रांत नवनवे प्रयोग होत आहेत तर शिक्षण क्षेत्रांत तरी कां होऊं नयेत असें शिक्षणमंत्री विमलाराजे परवां म्हणाल्याचें ऐकलें. मॅट्रिकच्या वर्गात मी 'हा हन्त हन्त नलिनीं गजमुज्जहार' या श्लोकाचा अर्थ, अरेरे, नलिनीला हत्तीनें हार घातला असा सांगितला होता–(मला वाटतच होतें कीं, आपण कुठें तरी चुकलों आहोंत म्हणून. कारण हत्तीनें नलिनीला हार घातला यांत कवीला 'अरेरे' करण्यासारखें काय आहे; मला समजेना. पण 'अरेरे' तरीहि मी तोच अर्थ सांगितला.) मुलें यावर हसली होतीं. कारण वर्गातल्या मिस् मिटकरचें नांव नलिनी होतें आणि मुलें मला हत्ती म्हणत होती. मास्तरांना तें माहीत नव्हतें. माझें तें संस्कृतचें ज्ञान पाहून आपटीकर मास्तरांनीं दीनपतित चेहरा करून अश्लील जोक मारला होता,

'अरे रे रे रे ! गायतोंडे तुम्ही शंकर शेठ कीं हो मिळवणार' तो मात्र षष्ठी तत्पुरुष समास होता हें मला 'पर्वा' समजलं. त्यानंतर पुढें दोन दिवस मी सगळ्यांना उजव्या गालफाडाला गालगुडदें झाल्याचें सांगत होतो. तीच कथा इंग्रजीची. Understand या शब्दाचा अर्थ मी, 'खालीं उभा राहणें' असा सांगितला होता. यावर तगारे मास्तर माझें पोपट हें नांव लक्षांत घेऊन म्हणाले, 'बोलला माझा राघू, गायतोंड्या, हें (बाका) वर उभें राहून सांगतोस कां ?' (शिवाय उलटा उभा राहायला सांगितलें तें वेगळेंच) अशा प्रकारें मला अंडरस्टँडचा अर्थ समजला होता.

तर, पूर्वी शिक्षक समजावून देत असत. आतां ते समजावून घेतात. सर्व क्षेत्रांत हे असे प्रायोगिक बदल होत असतां ते आमच्या 'तीर्थ(रूप) क्षेत्रीं' तरी कां होऊं नयेत, असें मी विचारतो. असें वाटूनच कीं काय नेपोलियनसाहेबांनीं–(रघ्या साठेनी माझ्या वडिलांना ठेवलेलें नांव) आपल्या अशा खास शैलींत मला त्रास द्यायला सुरवात केली. अतिशय स्वतंत्र शैलींत ते माझ्यावर प्रयोग करूं लागले. मात्र त्यांनीं मला समजावून घेण्याचा प्रयोग कधीं केला नाहीं. कधींच नाहीं. एकदां नाहीं, पुढच्या खेपेला समजावून घेतील असें वाटून मी

## —पद्माकर गोवईकर

दहावीच्या परीक्षेला तीनदां बसलो—अकरावीला अशीच कांही तरी तीनचार वेळा 'समज' देऊन पाहिली, पण ढीम नाहीं. मला समजावून घ्यायला ते जाम तयारच होईनात. एकूणच आमच्या तीर्थरूपांना अंडरस्टँडिंग कमी. इतकेंच त्यांतलें. आश्चर्य असें कीं, माझ्या व्यतिरिक्त इतरेजनांना समजावून घ्यायला ते फार उत्सुक असत.

सरकारांत त्यांचा वरपर्यंत लग्गा असल्यामुळें सुटीच्या दिवशीं अनेक संधिसाधू त्यांच्याकडून जॅक लाऊन घ्यायला येत. आणि आपलें काम होतें आहे असें पाहिल्यावर नाइलाजानें त्यांना आमच्या घरची चौकशी करावी लागे. 'हल्लीं पोपट काय करतो ?' हा प्रश्न मी ज्येष्ठ असल्यामुळें माझ्या विषयांत प्रथम विचारला जाई. निरनिराळ्या लोकांकडून या चौकशीच्या तागडा वेळोवेळीं पार पाडल्या जात. मग माझ्याविषयीं बोलतांना जसा चेहरा करावा लागतो तसा करून राजा दशरथ 'म्हणे, तो काय करणार ! इंटर नापास झालाय्. नोकरी करतोय् इतकंच... !' (सरकारी नोकरी करणें म्हणजे कांहींहि न करणें हें त्यांनीं स्वानुभवावरून ठरविलें होतें.)

हें वाक्य ऐकल्याबरोबर समोरच्या वशिलाला माझी सर्व जबाबदारी त्याच्यावर असल्यासारखी चिंता वाटून तो प्रयोग सुचवी, त्याला पहाटे उठवा तुम्ही. पहाटे चांगला अभ्यास होतो.'

मी पहाटें उठूं लागलों.

'नुसतें पहाटें उठून काय होणार ?' पुढच्या रविवारचा वशील सुचवे, 'गार पाण्यानें आंघोळ घालून त्याला अभ्यासाला बसवा.' त्याप्रमाणें मला अभ्यासाला बसविण्यांत येऊं लागलें.

'छे, हो. पहाटे उठण्यानें आणि गार पाण्यानें कांहीं अभ्यास होतो कां ? आपण नसतो कां पास झालो मग ?' वासूनाना शाळीग्राम –प्रयोग,–(या वाक्याला वडील त्यांना डोळ्याच्या जरबेनें कां गप्प करीत मला कळायचें नाहीं–), 'त्याचीं गाईडस् जाळा आधीं.'

तीर्थरूपांनी गाईडस् अक्षरशः जाळलीं आणि वर होळकऱ्या-सारख्या शिव्या दिल्या. शाळीग्रामांना ते म्हणाले, 'आमचा पोपट्या आहे तोपर्यंत कॉमर्स कॉलेजचा शंभरपर्सेंट निकाल त्याच्या बापजन्मीं लागणार नाहीं...'

'त्याचं काय आहे, खरं सांगू कां !' दी. प्र. (दीक्षित प्रयोग)–, 'सकाळीं उठून त्याला व्यायाम घ्यायला सांगा. निकोप शरीरानें अभ्यास चांगला होतो.'

हें ऐकून मात्र मी शुद्ध हरपलें. एकशेंबावन्न पौंड वजनाचा माझा गोळा वेडावाकडा व्यायाम घेतांना मला केळींअवेळीं दिसूं लागला. मुसक्या बांधलेलें अस्वल दरवेशी सांगेल त्याच्या पाया पडते तसा मी वागत होतो. अभ्यास करण्यासाठीं लागणाऱ्या इतर फालतु गोष्टींचेंच महत्व वाढत होतें. तें सांगण्यासाठीं मी जरा तोंड उघडलें कीं,

'एक शब्द बोलूं नकोस. तीनशें बैठका मारल्यास कां ?' अशी वडीलार्जित तोफ उडायची.

माझ्या विशाल वपूशीं वडिल असे हनुमान खेळ खेळत होते.

याच्यापेक्षांहि कहर म्हणजे 'डिक्याक'चें-(दोशी आणि खामकर कार्यालयाचा टेलिग्राफिक ॲड्रेस.) चालक आले आणि सांगून गेले,

'पोपट्याला एक मैना करून द्या. उद्यां पास होईल तो'. आपल्याच विनोदावर ते ख्या ख्या ख्या करून खिदळले आणि निघून गेले. माझें लग्न हा त्यांचा विनोद कां व्हावा हें मला समजत नाहीं. आमचे वडीलहि बिलंदर. हा प्रयोग वगळून त्यांनी इतर सगळे प्रयोग माझ्यावर केले. इतका प्रयोगशील पिता मी माझ्या बापजन्मीं पाहिला नाहीं.

आणि सगळ्यांत कहर म्हणजे रघ्या साठेनी केला. त्याला मी एकवीस वेळां सांगितलें कीं, 'रघोजी, माझ्या वडिलांना वाटेल तें सांगत जाऊ नकोस. मी अभ्यास करेन नाहींतर न करेन.'

त्या झिलग्यानें एक दिवस तोंडाकडे उताणा अंगठा नेऊन वडिलांना सांगितलें.

'मींऽ स्वतः पिऊन अभ्यास केला. पोपट्याला तुम्ही आणून द्या. मस्त अभ्यास करेल तो. बी. कॉम नाहीं झाला तर दारू सोडून देईन मी.'

रघ्याच्या बी. ए.च्या यशाचें आणि मंत्र्यांच्या वक्तृत्वाचें रहस्य एकच असावें, हें पाहून मी थंड झालों. 'एकच प्याल्यां'तल्या तळीरामासारखा वडिलांना सल्ला देऊन तो निघून गेला. वडील तर फार वाया गेल्यागत झाले. माझ्या चुलत भावाला त्यांनीं अस्सल इंग्लीश दारू आणायला सांगितली. (तो पोलीस इन्स्पेक्टर आहे.) भाऊ संध्याकाळीं बाटली घेऊन आला. रात्रीं नवाच्या सुमाराला मला अभ्यासाला बसवायचा कार्यक्रम रघ्यानें ठरवला. पहाटेपर्यंत माझा अभ्यास चांगला होणार होता. कुणी ऊठ म्हणेपर्यंत मी अभ्यासांतून डोकें वर काढणार नव्हतो, असें रघूच म्हणाला. मी पुस्तकें घेऊन गच्चींत गेलो. रघूची वाट पहात बसलों. रघ्या हरीण-उड्या घेतच आला. इकडे तिकडे न बघतां 'दशरथा, घे हे पायस दान' या स्टाईलवर त्यानें कोकाकोल्यांत दोनच थेंब मद्य घालून माझ्या हातांत पेला दिला. आपण मात्र 'अशी घ्यायची असते' असें म्हणून त्यानें या ऽऽऽहूऽ अशी आरोळी मारली. रात्रीच्या शांततेंत तो भलताच आवाज ऐकून आसपासची मंडळी थोडीफार दचकली. दारें किलकिलीं होऊन पुन्हां फटकन् लावल्याचें आवाज झाले. खालच्या गुंते बाई मोठ्यानें बोलल्याचा आवाज आला.

'मेला इंटरला हा गोंधळ तर बी. ए. ला काय होईल! कॉलेजं सोडा म्हणावं आणि गुत्ते उघडा...'

रघ्या वीरश्रीयुक्त किंकाळ्या छाती पिटून मारीतच होता. मी आणि माझा भाऊ त्याला वेसण घालण्याचा प्रयत्न करीत होतो. या सर्व गोंधळांत मद्यपुरस्कार मंत्र्यांना-(त्यांना आतां वडील म्हणायची लाज वाटते मला-) कशी काय कोण जाणे, पण जाग आली नाही-(नंतर कळलें कीं तेंहि 'घेऊन'च झोपले होते) मी आणि माझा भाऊ रघ्याला आवरत होतो. माझीं पुस्तकं प्रूफ रीडींगच्या अवस्थेंत गेलीं होतीं. शेवटीं रघ्या जात्या जिवासारखा ओरडला,

'नागेशपंऽऽत, (मद्यमंत्रि) तुम्ही ज्ञानेश्वर आहांत, तुमची गुलें म्यॉचोद निघालीं.'

हा रेडा असाच ओरडत राहिला तर ज्ञानेश्वर उठायला फार वेळ लागणार नव्हता. म्हणून त्याच्या मद्यमलीन मुखाची मुस्कटदाबी करून त्याला मागच्या जिन्यानें खालीं उतरवलें आणि होल्डालसारखा टॅक्सींत कोंबून त्याच्या खोलीवर त्याला पोंचता केलें.

सकाळीं उठल्यावर दारू पुरवठा खात्याच्या मंत्र्यांनी ॲसेंब्ली क्वेश्चन विचारला,








'पोपऽऽट, कसा काय झाला अभ्यास रात्रीं...'

त्रासलेल्या डोक्यानें मी ओरडलों,

'माझ्या बापाच्यानें असा अभ्यास होणार नाहीं...' मी घसरलोंच थोडा.

'गाढवाच्या लेका, मला सांगतोस काय!' त्यांचाहि तोल गेला,

'मी केलेला आहे तसा अभ्यास. तुझ्या आजोबांनीं मला तशा संथा दिलेल्या आहेत.'

'आजोबा गेले मसणांत.' मी 'चढल्या'-सारखा बोललों.

'हो, ते गेलेत पण मी आहे.' वडील मी मारल्यासारखे ओरडत होते.

'असा अभ्यास मी करणार नाही.' मी 'होणार नाहीं' वरून 'करणार नाहीं' वर आलो. मी फारच निर्णायक बोलल्याचें पाहून वडील थोडे खाली आले.

'गाढवा, मग पाडवा चांगला जायचा नाहीं तुला या वर्षी. बाईनीं केलेलें श्रीखंड पिठल्यासारखें लागेल त्या दिवशीं.'

'लोणचं घाला त्या श्रीखंडाचें.'

'मग व्हा नापास. बाऽऽ××लं तुझं शिक्षण!'

अशी शिवी घालून तीर्थरूप 'बेडिंग ब्यूटी'च्या मॉर्निंग शोला पसार झाले.

या सर्व प्रकारानंतर नाना गुसे, सोशल काम करणाऱ्या त्यांच्या मिसेस गुसे. दीक्षित, शाळीग्राम, दादो आबा सावन्त (पी. ए. टु फादर), आणि खुद्द गायतोंडे साहेब यांचें मी इंटर कां नापास होतो याच्या चौकशीसाठीं कमिशन नेमण्यांत आलें. बरीच खटपट करूनहि कमिशनला कुठेंच राऊंड टेबल मिळालें नाहीं, तेव्हां साध्या चौकोनी टेबलावरच राऊंड टेबल-कॉन्फरन्स घ्यायचें ठरलें. रविवारला लागूनच १५ ऑगस्टची सुटी असल्यामुळें तीन दिवस ओळीनें कॉन्फरन्स घ्यावी असें दीक्षितांनीं आपल्या गड्याबरोबर कळविलें. एक दोन मतभेदाचे प्रसंग सोडले तर कमिशनचें काम यथासांग पार पडलें होतें. माझ्या अभ्यासाविषयीं काय चर्चा झाली मला माहित नाहीं पण सोमवारी मध्यरात्रीच्या सुमाराला आमच्या हॉलमधून मला जीं कांहीं वाक्यें ऐकूं आली ती अशीं—,

'पण हें पहा, ती माझी पत्नी आहे...' हें गुसेशिवाय कुणीं बोलणें शक्यच नव्हतें.

'कवळी संभाळ दीक्षा...'

'तुझा बाप...'

'तुझाच...कुऱ्या...'

'अहो पण मारतां काय!'

'ईऽऽ'

'हात आंवरा... हाऽऽ कप् फुटला'

'दांडेच्या हात पिरगाळतोस!'



म्हणतात सारेजण
कथेमध्यें असावा
तिरकस आशय
धुंडाळला खूप-
उभा-आडवा तिडवा
पण नाहीं गवसला
आणि मग-!
मीच ठरलों
कथेचा विषय

—जयवन्त गुजर

☆☆☆☆☆☆☆☆☆☆☆☆☆☆☆☆☆☆☆☆☆☆☆☆

'अहो, टेबल टेबल...' भाड्याच्या टेबलाची काळजी करणारा हा स्वर मंत्रि-महाशयाचा होता हें मी काय सांगायला हवें!

थाड थाड्

धाड्

धम्म

खण्णऽऽ—

'सभेला एक नॉन् ब्रेन्हीन हवा' म्हणून केवळ तुम्हाला बोलावलें—याचा अर्थ—'

एवढें वगळल्यास कमिशनचें काम अगदीं शांततेनें 'पार पडलें' होतें. आणि तीन दिवसांच्या उपासानंतर मी आमच्या हॉलमधील फुटलेल्या कपबशाच्या काचा गोळा करत असताना गुसेबाईच्या सापडलेल्या गंगावनाकडे पहात उभा होतो.

सध्यां मी वडिलांच्या आमनेसामने खुर्चीत बसतो. त्यानंतर वडील माझ्याकडून इकॉनॉमिक्सचा एखादा धडा वाचून घेतात. नंतर लगेच त्यावर प्रश्न घालून माझ्याकडून—तिथल्या तिथें सोडवून घेतात. गुप्त्याच्या नानानीं कॉन्फरन्सनंतर हॉस्पिटलमध्यें जातां जातां ही नवी क्लृप्ति सांगितली. 'पोरगा बरोब्बर ताळ्यावर येईल.' अशी हमखास उंदीर मारण्याच्या औषधाची खात्री दिल्यासारखें त्यांनीं सांगितलें. माझ्यासारख्या २६ वर्षाच्या मुलाकडून अशा प्रकारें अभ्यास करवून घेण्याची त्याची भयंकर शैली मला आवडली नाहीं. कधी नव्हे ती—विलक्षण लाज वाटूं लागली. पण करणार काय. आपलेच दात आणि आपलेच वडील. अशा मोक्याच्या क्षणीं कुणीतरी वडिलांना भेटायला येते. येणारा गृहस्थ नवखा असतो. त्याला—कांही तरी खाजगी बोलायचें असतें. अर्थातच माझी अडचण भासते. मीहि कुणी बाहेरचाच भेटायला आलोय् असें त्याला वाटतें. अतिशय संशयानें तो माझ्याकडे पहात असल्याचें मला जाणवत असते. कांही केल्या मी माझ्याच समोर बसलेल्या वडिलाचा मुलगा आहे; हें त्याला पटत नाहीं. समोर ॲक्च्युअली वडील बसले असूनहि अजाणपणीं त्यांच्याच चरित्राचें गायन करणाऱ्या कुश—लवासारखी माझी स्थिति होते. उगाचच 'वनवासी' झाल्यासारखे वाटतें. तो गृहस्थ—फारसें न बोलता म्हणतो, 'पुन्हां कधीं तरी येईन. थोडं खाजगी बोलायचें होतें...'

वडील त्याच्या मर्मबंधांतली अडचण बरोबर ओळखतात आणि म्हणतात,

'अहो, बसा ना. हे आमचे थोरले चिरंजीव पोपटराव आहेत.' (तिऱ्हाईताच्या देखत स्वतःच्या वडिलांनी आपल्याला आदरार्थी बहुवचन संबोधल्यावर काय वेदना होतात ज्याच्या त्याला ठाऊक.)

'अस्सं होय!' असें म्हणून ते टेकतात. 'अस्सं होय' ते अशा स्वरांत म्हणतात कीं, जणुं कांहीं मीच वडील असतो आणि समोर बसलेले माझे वडील माझा मुलगा असतात. माझी सुटका होते पण







अनुक्रमणिका

मला फार ओशाळल्यासारखं वाटलं. माझ्या लहानपणाची खरी अडचण मला तेव्हां भासते. हाच बापाचा मुलगा हें मानायला एरवीं वडिलांनी सांगे-पर्यंत कुणी तयार होत नाहीं. आतां बुद्धिमांद्य आणि थोडासा लहानपणा माझ्यासारख्या अंडर ग्रॅज्युएटच्या हातांत आहे कां? पण मला समजावूनच घ्यायचें नाहीं ना!

सिम्पल लिव्हिंग ॲंड हाय थिंकिंग मधला उत्तरार्ध जरी मला फारसा जमला नाहीं तरी देवाशप्पत मी खरं सांगतो, मला साधी राहणीच आवडते. मी बूट–पाटलोण घालतो, पण उगाच थेर करत नाही. मला तें आवडतहि नाहीं. उगाच खोटं कशाला सांगा. शिंपी शिवेल त्या फॅशनचे आणि धोबी धुवेल तितके स्वच्छ कपडे वापरायचे एवढीच मी चूक करीत आलो आहे. पण वडिलांना इतकें सिम्पल आवडत नाहीं. त्यांना म्हणजे हाय लिव्हिंग ॲंड हाय थिंकिंग हवें. (त्यामुळें मला हाय! हाय! करायची वेळ आली आहे.) इतर मुलें कसे कपडे वापरतात, कसे सिनेमे बघतात, कशी रोज दाढी करतात हें दिवसातून अभ्यास करायला सांगितल्यानंतरच्या वेळांत ते सारखे सांगत असतात. इतर मुलांसारखे मीहि तसें तसें करावें असें त्यांना वाटतें. मला तें जमत नाहीं. म्हणून मी मित्रांना घरींच कधीं आणत नाही. रघ्या साठेला मी या विषयात हज्जार वेळां सागितलें.

'रघ्या, नाहीं तो चवचालपणा करून माझ्या घरीं येत जाऊं नकोस...'

रघ्या यावर हंसला आणि शनिवारीं पुन्हा घरीं आला. नुसता आला नाहीं तर हनुवटीवर बुल्गानीनसारखा केसांचा झुपका ठेऊन आणि डोळ्यात काजळच घालून आला. वडील दाढी करीत होते. मी रविवारी दाढी करीत नाहीं. रघ्या आला तो थेट त्यांच्याशीं गप्पा मारायला लागला. महर्षींनीं मला हांक दिली. मला वाटलें त्यांना दाढीला गरम पाणी हवें म्हणून मी उन्ह पाण्याची वाटी घेऊन गेलो. अदबीनें जाऊन उभा राहिलों. अशा वेळीं मी नेहमी बावळट कां वाटतों मला समजत नाहीं. वडील एकदम ओरडले,

'वाटी ठवा खालीं...'

मी वाटी खालीं ठेवली.

'तें बघा' राणीच्या बागेंतला एखादा प्राणी दाखवावा तसें रघु-कडे बोट दाखवून मला म्हणाले,

'बघा तें...'

'त्यात काय, दाढी राखली आहे त्यानें' मी असह्य होऊन म्हणालों.

'इतकें बेदरकार वागतां आलें पाहिजे. मला आवडलें. बाया ठेवण्यापेक्षा दाढी ठेवणं चांगलें. सगळं करावं. तुला मी रोज दाढी कर म्हणून सांगितलें. तूं करत नाहींस. मी म्हातारा असून रोज दाढी करतो. निदान वाढव तरी अशी मग...'

मी ओळखलें, हा झटका आहे.

इतक्या थराला त्यांचें पुरोगामित्व जाईल असें मला वाटलें नव्हतें. माझ्या अंगाचा तिळपापड झाला. रघ्याच्या तंगड्याला एक हात आणि नरड्याला दुसरा हात घालून वर उचलावा आणि फ्री–स्टाईलच्या डावासारखा गरगर फिरवून खिडकीबाहेर फेकून द्यावा असें वाटलें. मी त्याला खुणेनें बाहेर बोलावलें. अंगठ्यानें आणि तर्जनीनें त्याची थिटी दाढी हलवीत मी त्याला विचारलें;

'रघ्या, गाढवा! तुला सांगितलें होतें ना, असले रंग करून आमच्याकडे येत जाऊं नकोस म्हणून!'

'मी वाटेल तें करीन, तुझें काय बिघडलें?' माझ्या चिमटींतून दाढी सोडवून घेत तो म्हणाला.

'थूः श्यामफूल' मी ओरडलों, 'तूं दाढ्या ठेव वा बाया. पण तें ठेवून आमच्या घरी कां येतोस?'

'मग तूं सायकल का शिकत नाहींस?' त्याच्या तिरकं बोल-ण्याचा कळस झाला होता. मला काय काय येत नाहीं याची यादी जोरजोरांत सांगून हा आणखी कांहीं खेकटीं माझ्या अंगावर आणणार हें पाहून मी चिडलों. त्याचा शर्ट गळ्यापाशीं धरून मी त्याला नारळाच्या झाडासारखें गदागदा हलविलें.

साल्या, म्हणून मी दाढ्या वाढवून आणि काजळ घालून नाच्या बनूं काय?'

'म-म-मग-तू तूं सा-सा य क क ल...'

मी त्याच्या मानगुटीला धरून जिन्यावरून खालीं ढकलून दिलें आणि हात झटकून मागें वळलों तों खालीं गलका झाल्याचें ऐकलें. मिसेस गुते किंचाळत होत्या—

'उच्छाद मांडलाय मेल्यांनी. धाड् धाड् जिने वाजवत उतरतात. डोळ्यांच्या खाचा झाल्या कां रे, रांडीच्या. बोकड मेला.'

मी मागें वळून खालीं पाहिलें. शेवटच्या पायरीवर निवांत अस-लेल्या मिसेस गुप्त्याच्या अंगावर घरंगळत गेलेला छेलबटाऊ रघ्या धप-शेल कोसळला होता. कॉन्फरन्सनंतर हॉस्पिटलमध्यें गेलेले गुते अजून परत न आल्यामुळें आधींच त्या चिंताक्रांत झाल्या होत्या. त्यांत हा त्रास. पदर खोचून त्या त्याला 'बोकड मेला' म्हणत होत्या. मी पाहात होतो. मला आनंदाच्या उकळ्या फुटत होत्या. दोन्हीं पाय हवेंत वर उचलून नाचावेसें वाटत होतें. पण तो विचार मी बदलला. कारण गुतेबाई शेवटच्या पायरीशीं अजून उभ्या होत्या. रघ्या त्यांना समजावून सांगण्याचा निष्फळ प्रयत्न करीत होता, पण त्यानें मला ढकलून दिलें त्याला मी...'

'माड्या चढायला सांगतो कोण मेल्या?' गुतेबाई घसरून हें वाक्य बोलायला आणि काय गडबड हें पहायला माझें वडील माझ्या पाठिशीं येऊन उभें रहायला एक गांठ पडली. 'माड्या चढायला सागतो कोण?' हें वाक्य त्यानी ऐकलें आणि गालाला अर्धवट साबण लावलेले (असे ते) माझें वडील माझ्या कानाशीं लागले,

'काय रे, मिस्टर गुते पुन्हा त्या बाईची माडी चढले वाटतं?'

'तसंच वाटतंय्' मी कशाचीहि दाद न देता म्हणालो.

'आणि साठे कुठाय?' गाल फुगवत वडिलांनीं विचारलें.

'सायकलचें कुलूप लावायला तो विसरला, तें लावायला गेलाय.'

एवढं म्हणायचा अवकाश. माझें वाक्य मधेंच तोडून ते म्हणाले,

'बघ, तो सायकलवरून येतो. आपण शिकावी सायकल. पन्नास वेळा तुला सांगितलें, सायकल शीक म्हणून. काय तुझी नक्की काय अडचण आहे.'

त्यांच्या साबण लावलेल्या चेहऱ्याकडे मी रागानें पाहिलें. पूर्वीं कधीं इतका त्यांचा राग मला आला नव्हता. अतिशय क्रूर विचार माझ्या मनांतून धांवत गेले. पण 'मना, धीर सोडूं नकोस' हा नारायण-रावांचा मनोपदेश मी आठवला आणि केवळ एका संतवचनानें त्या दिवशीं एक हिंसा टळली.

हिंदी सिनेमांतील गोप या नटाशी आणि मराठी सिनेमांतील दामुअण्णा मालवणकर या नटाशीं एकाचवेळीं साम्य असलेल्या कोण-त्याहि इसमानें वयाच्या सव्वीसाव्या वर्षी सायकल चालवायला शिकणें मला मंजूर नव्हतें. कुणी, 'सध्या काय करतां?' म्हणून विचारलें तर 'सायकल चालवायला शिकतो?' असें कां सांगायचें?

पण 'पितृकामना पुरी होऊं दे' असें अलिकडे मला वाटूं लागलें. विद्यार्थीदशेंतल्या इतर अपेक्षा माझ्याकडून वेळच्यावेळीं

अनुक्रमणिका

पूर्ण होणार नाहींत हें मला स्पष्ट दिसत होतें. इकडच्या आळीला तरी कांहीं विक्रम करावा असा विचार आला. पण धरलेला धीर इथंहि सोडवत नव्हता. धीर आणि जीव एकाच वेळेला इतक्या तडकाफडकीनें सोडायचा मला धीर होत नव्हता. माझी अतिशय उलाघाल झाली. आणि मग मला मी सायकल चालवूं लागल्याचीं निरनिराळीं स्वप्नें वेळींअवेळीं पडूं लागलीं. हातांतलें अकाउंटन्सीचें पुस्तक गळून पडूं लागलें आणि हां हां म्हणता मी सायकलस्वार होऊन कॉलेज टू घर अँड घर टू ऑफिस येऊं जाऊं लागलों. एका स्वप्नांत तर मी सायकल चालविण्याचा विक्रमच केला. सव्वा महिना मी अहोरात्र सायकलच चालवत होतो. लोकांनीं थांब म्हणेपर्यंत मी सायकल चालवली. सायकल थांबवली पण खालीं उतरलों नाहीं. म्हटलें, 'वडिलांनीं खाली उतर म्हणून सांगितल्याखेरीज मी उतरणार नाहीं...' शेवटीं वडील एक नारळ आणि शाल घेऊन माझा सत्कार करायला आले आणि म्हणाले, 'असा विक्रम परीक्षेंत करण्याविषयीं तुझें काय मत आहे?'

'लौकरच ती योजना मी हातीं घेणार आहे.' असें पराभूत गिर्यारोहकांच्या नेत्याच्या स्वरांत म्हणून सायकलवरून खाली उतरलों. खाली उतरल्याबरोबर प्रो. देवलांनीहि माझा सत्कार केला व मला आपल्या संस्थेंत येण्याविषयीं विषयीं विनंती केली.

दुसऱ्या स्वप्नांत मी मला सायकल येते याची वडिलांना खात्री न पटल्यामुळें त्यांना डबल सीट घेऊन फिरूं लागल्याचें दिसलें. या खेपेला मात्र 'सुशिक्षित असूनही तुम्हीं असें करतां' याचें न्यायमूर्तींनीं कौतुक केलें...

या स्वप्नांचाच पुढें मला इतका त्रास झाला कीं, एक दिवस साळ्याला मी भाड्यानें सायकल आणायला सांगितलें. जन-संपर्क नको म्हणून मी चांदण्या रात्रीं प्रॅक्टीस घ्यायची ठरविलें आणि आसपास कोणी नाहीं असें पाहून एके रात्रीं पायट्यावर पाय ठेवला. पुढें तीन-मिनिटें मला काय झालें तें कळलेंच नाहीं...

...जेव्हां कळूं लागलें तेव्हां मिसेस् पाटणकर माझी तब्येत बघा-यला आल्याचें दिसलें. काळजीयुक्त स्वरांत त्यांनी माझी चौकशी केली. बशींतलें पोहे संपवीत आपला वसंता त्री. कॉम्‌ला पहिला आल्याचें सांगितलें, आणि चहांत शंकरपाळी (तांदूळ भिजत ठेवल्यासारखी) भिजत ठेवत त्यांनीं माझ्याविषयीं पुन्हां एकदां काळजीनें थबथबलेला प्रश्न वडिलांना विचारला;

'तुमच्या पोपटचें हें तिसरें वर्ष नाहीं कांहीं इंटरचें!'

वडिलांच्या चेहऱ्यावरील सूक्ष्म बदल माझ्या नजरेच्या वेध-शाळेनें टिपला. त्यांनी नुसते 'हूं' म्हणून सुस्कारा सोडला आणि एकाएकी माझ्या प्लास्टर केलेल्या पायावरून सव्वाशें सायकली पळत गेल्या आणि 'कळा ज्या लागल्या पाया' तो कसाबसा उचलून धरीत मी कूस बदलली. तेवढ्यांत माझा धड असलेला उजवा पाय न पाहवूनें त्या म्हणाल्या,

'खरें सांगू कां दादासाहेब! म्हंजे मी आपलं म्हणते हं, मेल्या सायकलीपेक्षां तुम्ही त्याला स्कूटर घेऊन द्या. ती चालवायला सोपी जाते. आमच्या वसंताला मी...'

पुढचें मला कसें ऐकूं येणार! आणि या वेळेला इंटरचें चौथें वर्ष घालवायला उजवा पाय हात देणार इतकाच निष्कर्ष काढून मी गपकन् डोळे मिटले. (मिटल्या डोळ्यांपुढें मी वडिलांना डबलसीट घेऊन स्कूटर चालवीत असल्याचें दिसलें) तसें पुन्हा टक्कन् उघडले.

तात्पर्य इतकेंच कीं, डोळे मिटायचीसुद्धां सोय राहिली नाहीं. संतकवि तुकोबांनी ती ओवी बहुधा उघड्या डोळ्यानीं लिहिली असावी.

● ● ●



—आत्माराम नीलकंठ

# द्रोणा, तूं मधांत घोळलेली सुरी आहेस

## धृष्टद्युम्नं अमर्षणम् २२

### हा धृष्टद्युम्न तुझा सेनापती असो

कौरवांशीं युद्ध करावयाचें असा निर्णय झाला. युधिष्ठिरानें आपल्या सात अक्षौहिणी सेनांचे नायक ठरविले. ते म्हणजे द्रुपद, विराट, धृष्टद्युम्न, शिखंडी, सात्यकी,, चेतिकान आणि भीमसेन हे होत. हे सारे महावीर होते. युद्धकौशल्यावर पांडवांतील एकाची निवड करावयाची तर ती अर्जुनाची होणें अधिक युक्त होतें. पण युधिष्ठिरानें वयाच्या अनुक्रमानें भीमाचें नांव घेतलें असावें. अर्थात वयाप्रमाणेंच अनुक्रम लावायचा तर युधिष्ठिरानें आपला स्वतःचा क्रम प्रथम लावावयास पाहिजे होता. तो न लावण्यास अनेक कारणें संभवतात. एकतर आपणच आपलें नांव कसें सांगावयाचें ? पण द्रौपदीविवाह प्रसंगीं ज्या धीट माणसानें आपलें नांव प्रथम सुचविलें त्याला इथेंहि तें सुचावयास हरकत नव्हती. शिवाय यावेळीं लाभाचा प्रश्न नसून जबाबदारीचा प्रश्न होता. जबाबदारी घेतांना मागें सरण्यांत फारसा विनय असतो असें नाहीं.

कदाचित आपलें नांव युधिष्ठिर असलें तरी आपण युधिपंलायन आहोंत हें त्याचें त्यालाच ज्ञात असल्यानें त्यानें योग्य निर्णय घेतला असावा. कदाचित आपण राजा (होणार) असल्यानें त्याला सेनापती इतरांनी होणें इष्ट वाटलें असावें. कदाचित संकट येतांच भीमास पुढें लोटावयाची जी संवय त्याला लागलेली होती त्याचा हा परिणाम असावा. असो. घरचा सेनापती भीम ठरला. आणि या सर्वांचा मुख्य सेनापती कोण असा प्रश्न उभा राहिला तेव्हां सहदेव, नकूल, अर्जून आणि भीम यांनीं अनुक्रमें विराट, द्रुपद, धृष्टद्युम्न आणि शिखंडी यांचीं नांवें सुचविलीं.

या प्रत्येकाला आपापल्यापरीनें पार्श्वभूमी आहे. विराट हा नुकताच स्नेही आणि नातेवाईक झाला होता. त्याच्या घरांतून सैन्याच्या जमवाजमवीपासून तयारीस आरंभ झाला होता. तेव्हां नांव सहदेवास सुचलें असावें. विराट नातेवाईक तसा द्रुपदही नातेवाईक शिवाय जुना. अशा विचारानें द्रुपदाचें नांव पुढें आलें असावें. जो स्वतः शूर होता त्या अर्जुनास विराट व द्रुपद यांच्या पराक्रमाची जाणीव होती. शिवाय ते वयस्क असून त्यांचें वय भीष्माप्रमाणें व्रतस्थ रहाण्यांत न संपतां जगरहाटीप्रमाणें संपलें होतें. त्यामुळें त्यांच्या पराक्रमास आहोटी लागली असणें साहजिक होतें. त्यामुळें अर्जुनानें धृष्टद्युम्नाचें नांव सुचविलें. भीमानें शिखंडीचें नांव सुचविलें. तोही महावीर होता. शिवाय प्रतिपक्षाचा मुख्य सेनापती भीष्म याचा तो हाडवैरी होता. त्यामुळें तो भीमास उचित वाटला असावा.

या चार सूचना आल्यावर शेवटचा निर्णय घेण्याची जबाबदारी युधिष्ठिरावर आली. परंतु जो युधिष्ठिर स्वतःच्या भावांना दुखविणारे निर्णय अविचारीपणानें एका क्षणांत घेत असे तोच युधिष्ठिर परक्यांना दुखविणारे निर्णय कधीही घेत नसे. अशा प्रसंगी याला विचार, त्याला विचार करून तो प्रसंग सावरून घेत असे. त्याला निर्णयशक्तीच नव्हती. त्यामुळें आताही त्यानें निर्णय घेण्याची जबाबदारी श्रीकृष्णावर टोलवली व त्याला यांत गुंतविलें–तो म्हणाला, 'चला, कृष्ण म्हणेल तो सेनापती. मग मी तरुण असो वा वृद्ध असो. शूर असो वा नसो.'

पांडवांसाठीं अडचणींत पडण्याची कृष्णाला संवय होतीच. तो अडचणींतून बाहेर पडावयास समर्थही होता. त्याची बुद्धि मूलगामी असून द्रौपदीचा अपमान हेंच युद्धाचें मूल कारण अशी त्याची धारणा होती. दौत्याला जातांना द्रौपदीनें दाखविलेले केस त्याच्या समोर होते. तो म्हणाला,

—'बुद्धिवान युधिष्ठिरानें ज्यांचीं नावें घेतलीं हे सारेच सेनापती होण्यास योग्य आहेत. हे





अनुक्रमणिका

सारे फार पराक्रमी योद्धे असून ते इंद्राचाही पराभव करतील. मग पापी दुर्योधनाचा काय पाड ! या युद्धांत कौरवांचा पराभव होणारच. शूरहो, हा धृष्टद्युम्न तुमचा सेनापति असो.'

नेहमीं सुसगत बोलणाऱ्या श्रीकृष्णाचें हें भाषण अर्धवट दिसतें. पण एकाची निवड करून इतर तिघास दुखविण्याचा हा प्रसग होता. कितीही घोळ घातला तरी हा प्रसंग टळणार नव्हता. त्यामुळें तो उगाच वडवडत बसला नाहीं. सर्वांची मामुली स्तुती करून त्यानें झपकन विषयांतर केलें आणि निर्णय दिला. त्याचीं कारणें देण्याच्या भानगडींत तो पडला नाहीं. त्यानें अर्जुनाला सरसेनापती कां नाहीं केला ? भीम कां नाही- ? धृष्टद्युम्नच का ? अर्जुनानें त्याचें नांव सुचविलें म्हणून कृष्णानें त्याला पाठिंबा दिला आणि अर्जुनाचें मन राखलें, असा याचा अर्थ नाहीं. धृष्टद्युम्न हा उचित नसता तर अर्जुनाचें मन राखण्यासाठीं म्हणून कृष्णानें सर्वोच्च मान त्याला दिला नसता.

विराट द्रुपद म्हातारे–ते सोडून द्या. पण भीमार्जुन धृष्टद्युम्नापेक्षां कांकणभर अधिक सरस होते. पण कृष्णानें त्याचा विचारहि केला नाहीं. कारण कौरवांचे सेनापती भीष्मद्रोण होणार हें त्याला माहीत होतें. या गुरुजनांसमोर उभें रहाताच भीमार्जुन शौर्यामुळें नाहीं तरी संस्कारामुळें लटपटणार हें कळण्याएवढी त्यांच्या सत्प्रवृत्तीशी कृष्णाची ओळख होती. त्यामुळें हे निरुपयोगी झाले. मग उरले धृष्टद्युम्न आणि शिखंडी. शिखंडीचें भीष्माशीं वैर असलें तरी धृष्टद्युम्न हा वडील होता. शिवाय तो द्रौपदीचा सख्खा भाऊ होता.

युद्ध व्हावयाचें होतें तें द्रौपदीच्या अपमानाचा बदला घेण्यासाटीं. या अपमानाची फेड करावयाची ईर्षा अचल निष्ठेनें धृष्टद्युम्नच धरूं शकणार होता. युधिष्ठिर सारखा बुद्धिभेद करीत असल्यानें भीमार्जुनांची निष्ठा या ध्येयावर एवढी अचल नव्हती हें सिद्ध झालें होतें. झपकन् दुर्योधन दोनचार गांवांची भीक देता तर युधिष्ठिराची व भीमार्जुनाची निष्ठा डळमळती. मग द्रौपदीच्या अपमानाचें काय होतें ? याच अचल निष्ठेनें कौरवांच्या वृद्ध सेनापतीचें वय व नातें असल्या गोष्टी दुर्लक्षून त्यांचा धुव्वा उडविण्यास सर्वथैव आवश्यक असा निष्ठुर ताठरपणा ( Ruthlessness ) सख्ख्या बहिणीच्या अपमानाच्या डांचणीनें एक धृष्टद्युम्नच दाखविणार होता. त्याची चीड ही भीष्मद्रोणाच्या आदरापुढें लंगडी न ठरण्याएवढी निर्भेळ होती. सूक्तासूक्त पद्धतीनें कौरव सेनापतींचा निःपात करावयास तो बद्धहस्त होता. जरूर तर युधिष्ठिराची धर्मयुध्दाची बुरबुर तो गुंडाळून ठेवील ही कृष्णाला खात्री होती. यशासाठीं हें अवश्य होतें. त्यामुळें त्यानें उगाच घोळ न घालतां त्याची सरसेनापती या महत्पदावर नेमणूक केली. तो सेनापती झाल्यावर द्रौपदीचे केस दुःशासनाचें रक्त पिऊं शकतील अशी खात्री असल्यानें कृष्णानें अमर्षशील असें त्याचें नांव निश्चित केलें.

## मधुदिग्धामिव क्षुरम् २३

## द्रोणा, तूं मधांत घोळलेली सुरी आहेस

महाभारतकारानें पुष्कळदा आपली इतिहासकाराची भूमिका विसरून नीतिबोधकाराची भूमिका स्वीकारली आहे. कौरवांच्या पक्षाचा पराभव झाला, तो तो पक्ष अनीतीचा, अधर्माचा होता म्हणून झाला अशी मीमांसा जागोजाग करतांना त्याला आनंद वाटतो. कदाचित् आपद्धर्म म्हणून त्याला असें वागावें लागलें असावें. कारण भारत हें जनमेजयास सांगितलें असल्यानें त्यांत त्याच्या पणजोबांची स्तुति आणि त्यांच्या शत्रूंची निंदा करणें अपरिहार्य झालें असावें.

अधर्माच्या पक्षाचा असा पराभव होतो असें जगाचा इतिहास पाहून म्हणतां येत नाहीं. उलट जो विजयी होतो त्याचा पक्ष मागून धर्माचा ठरविण्यांत येतो असें इतिहास सांगत आहे. भारतीय युद्धांत पांडवांचा जय झाला तो युधिष्ठिराच्या धर्मयुद्धामुळें झाला नाहीं तर कृष्णाच्या युद्धधर्मामुळें झाला हें उघड आहे. कौरवांचा पराभव झाला त्याला अधर्माहून वेगळीं कारणें आहेत.

त्यांतील एक महत्वाचें कारण कौरवांचें सारे सेनापति होत. हे सारे सेनापती पांडवधार्जिणे होते यांत शंका नाहीं. भीष्म–द्रोण या कौरवपक्षीय वीरांचा वध झाल्याशिवाय त्यांचा पराभव होणार नाहीं; आणि हा पराभव भीमार्जुनाच्या हातून होणें दुरापास्त आहे हें जाणून ज्याप्रमाणें कृष्णानें पांडवांच्या सेनापत्याचा अभिषेक धृष्टद्युम्नास केला, त्याचप्रमाणें भीमार्जुन यांचा वध झाल्याशिवाय पांडवांचा पराभव होणार नाहीं हें ओळखून तो वध निश्चयानें करूं शकतील अशांनाच सेनापती करावें हा विचार कौरवांकडे झाला नाहीं. कौरवांचे सेनापती निवडले गेले ते या दृष्टिशिवाय दुसरा विचार करूनच निवडले गेले. कौरवपक्षाचा कौटिल्य शकुनी हा या बाबतींत कृष्णाच्या पासंगासही न पुरावा असा उणा पडला. त्याचें डोकें जुगार खेळण्यांत जसें चाललें तसें युद्धसंचलनांत चाललें नाहीं. पांडवांच्या यशाचें मूलकारण धर्म अथवा नीती हें नसून कृष्णाचें सूत्रचालन हें आहे. त्याचप्रमाणें कौरवांच्या पराजयाचें कारण अधर्म अथवा अनीती हें नसून शकुनी या त्यांच्या सूत्रचालकाची असमर्थता हेंच आहे. त्यामुळें कौरवांच्या वाट्यास युक्त असें सेनापती आले नाहींत.

ज्यासाठीं युद्ध करावायचें त्या दृष्टीनें भीष्म हा कौरवांचा सेनापती बनणें इष्ट नव्हतं. दोन्ही पक्षांचे वीर त्याचे नातू असल्यानें, आणि त्यांतूनही पांडवांकडे त्याचा कल असल्यानें, सेनापती होतांना, त्यानें, मी भीमार्जुनाचा वध करणार नाहीं, दुसरें लक्षावधी वीर मारीन अशी आपली भूमिका स्पष्ट केली होती. पुढें भीष्म आणि द्रोण यांना मी कसें मारूं अशा व्याकुळतेनें जेव्हां अर्जुनाचें गांडीव धनुष्य त्याच्या हातांतून घळूं लागलें तेव्हां 'तुला सर्व पापांतून मी सोडवीन. तूं काळजी करूं नको' असें सांगणारा कृष्ण हाताशीं होता. पण मी भीमार्जुनास मारणार नाहीं असें भीष्म म्हणाला तेव्हां त्याला 'नियतं कुरू कर्मस्तम' नेमून दिलेलें काम कर असें सांगण्याचें सामर्थ्य असलेला कौरवपक्षाकडे कोणीही नव्हता. दुर्योधनाकडे सत्तेचा उन्माद उदंड असला तरी राजकारणी पुरुषाची बुद्धि शून्य होती. त्यामुळें सारखें सारखें 'तुम्ही आम्हास विजय मिळवून देतों असें सांगितलें आहे. अजून विजय मिळाला नाहीं असें कुरकुरण्यापलीकडे तो कांहीं करूं शकला नाहीं.' दुर्योधनास डोकें नव्हतें ही गोष्ट जेव्हां युधिष्ठिरानें शेवटीं त्याला 'तूं कोणाशीही युद्ध कर. जर त्याचा पराभव झाला तर आम्ही हरलों' असें जुगारी आवाहन केलें तेव्हां सिद्ध होतें. तेव्हां शकुनी हयात असता तर त्यानें निश्चयानें दुर्योधन आणि युधिष्ठिर यांचें युद्ध घडवून क्षणांत सर्वनाशाचा प्रसंग पांडवांवर आणला असता. दुर्योधनास बळाचा उन्माद असल्यानें तो युधिष्ठिरासारख्या क्षुद्र शत्रूशीं युद्ध करावयास प्रवृत्त झाला नाहीं हें पांडवांचें सुदैव. नाहींतर आजवर पांडवांच्या मामेभावाचें राजकारण कौरवांच्या मामाच्या राजकारणावर कडी करीत होतें तें पारडें उलटून कौरवांच्या मामानें पांडवांच्या मामेभावाचा नाइलाज करून टाकला असता.

तेव्हां सांगावयाचा मुद्दा असा की दुर्योधनास राजकारणी डोकें नव्हतें. मी पांडवांस मारणार नाहीं अशा अटीवर भीष्मानें सेनापत्य स्वीकारलें, तेव्हां त्याला 'सांगितलेलें काम कर' असें सांगण्याचें सामर्थ्य कोणास नव्हतें.

द्रोण सेनापती झाला तव्हां हीच परिस्थिती. भीमार्जुन यांना मी जिंकणार नाहीं अशा प्रस्तावनवरच त्यानें अधिपत्य स्वीकारलें. अनेकवेळां दुर्योधनाच्या अंगाच्या संताप व्हावा अशी परिस्थिति द्रोणानें आणली. जयद्रथाचें रक्षण मी करीन असें द्रोणानें वचन दिलें असतांही जेव्हां अर्जुनाचा रथ द्रोणास डावलून कृष्णानें जयद्रथाच्या मागें नेला तेव्हां संतापून दुर्योधन द्रोणास म्हणाला, 'द्रोणा, तू मधांत घोळलेल्या सुरीप्रमाणें माझा गळा कापीत आहेस.' पण इतक्या उशिरां हें म्हणून कांहीं उपयोग नव्हंता. द्रोणास सेनापती निवडण्यांत मागे झालेल्या चुकीची पुनरावृत्तीच झाली होती.

कर्ण सेनापती झाला तेव्हां परिस्थितींत काहींही बदल झाला नाहीं. कर्ण हा युद्धधर्माऐवजीं अधिकांश धर्मयुद्धानें वागला. त्यामुळें कुंतीस दिलेलें वचन पाळण्यासाठीं त्यानें धर्म, भीम, नकुळ आणि सहदेव हे पराभूत होऊन हातांत सापडले असतां त्यांना जिवंत सोडून दिलें. कर्णाचा सत्यवचनीपणा इत्यादि गुण, यानें सिद्ध होतात पण त्याच्या सेनापत्यास त्यामुळें मोठाच उणेपणा येतो. शिवाय कर्णाचा सारथी हा पंचमस्तंभी माणूस होता.

कर्णाचा वध झाला तेव्हां युद्ध संपलेंच होतें. यापुढें कोणीही सेनापती केला तरी विशेष बिघडणार नव्हतें. तरीही पांडवांचा मामा शल्य हाच सेनापती केला गेला. ही सारी मालिका दुर्योधनानें वर्णिल्याप्रमाणें मधांत घोळलेल्या सुरीप्रमाणें आहे. ही निवड करतांना जर कृष्णाप्रमाणें उचित असा विचार केला गेला असता तर युद्धाचें लक्षण बदललें. अश्वत्थामा शेवटीं सेनापती झाला तो पहिल्यापासून असता तर त्यानें दुर्योधनास मरतांना सुख दिलें तें अगोदर दिलें असतें.

या दृष्टीनें कृष्णाचें राजकारण हें शकुनीच्या राजकारणावर मात करणारें झालें. शकुनीची बुद्धि हा विषय पेलूं शकली नाहीं आणि अधर्म किंवा अनीति यापेक्षां उचित अशा राजकारणी बुद्धीचा अभाव यामुळेंच कौरव मातीस मिळाले.

## धर्मान् संस्थापयामास ।। :२४:

## प्राण नसलेली धर्माची चौकट

भारतीय युद्ध हें धर्मयुद्ध होतें असें म्हणतात. धर्माच्या व्याख्येप्रमाणेंच धर्मयुध्दाची व्याख्याही गहन आहे. धर्मराजासाठीं झालेलें युध्द तें धर्मयुध्द म्हणतां येईल किंवा पांडवांचा ज्या राज्यावर धर्मानें अधिकार होता तें राज्य मिळविण्यासाठीं म्हणजे धर्माच्या रक्षणासाठीं झालेलें युध्द असाही अर्थ होईल. किंवा धर्मानें व नीतीनें खेळलें गेलेलें युध्द असाही अर्थ होईल. तिसरा अर्थ सर्वमान्य आहे. म्हणजे हें युध्द धर्मानें खेळलें गेलें.

ज्या धर्मानुसार हें युध्द खेळलें गेलें त्याचे नियम कोणते ? ते भीष्मपर्वांत पुढीलप्रमाणें दिलेले आहेत. 'संध्याकाळीं युध्द बंद करून परस्परांशीं प्रेमानें वर्तन करावयाचें. त्यावेळीं कुणाबद्दलहि शत्रुता बाळगावयाची नाहीं. जो वाग्युध्द करीत असेल त्याच्याशीं वाग्युद्धच करावें. जो सैन्याबाहेर निघून जाईल त्याचा वध करावयाचा नाहीं. रथानें रथीशी—घोडेस्वारानें घोड़ेस्वाराशीं असें युध्द करावें. ज्याची ज्याप्रमाणें योग्यता, इच्छा, उत्साह, बल त्याप्रमाणें त्याला सावध करून त्यावर प्रहार करावा. विश्वस्त आणि भ्यालेला यावर प्रहार करावयाचा नाहीं. जो दुसऱ्याशीं युध्द करीत आहे, जो शरण आलेला आहे, जो पळत आहे, जो निःशस्त्र आहे त्याला ठार करावयाचा नाहीं. सूत, ओझींवाले, वाजंत्री यावर प्रहार करावयाचा नाहीं.'

एवढें निश्चित नियम ठरवून युध्दास आरंभ झाला आहे. पुष्कळदां सत्पुरुषांनीं स्थापन केलेला धर्म त्यांच्याबरोबर नाश पावतो. ख्रिस्ताच्या मनांत ख्रिस्ती माणसाचें जें स्वरूप होतें तें त्याच्याबरोबर नाश पावलें व मागें फक्त धर्मगुरूंचें राजेशाही अवडंबर राहिलें. युद्धाची गत तीच. धर्मस्थापकांच्या धर्मांतील प्राण त्याच्याबरोबरच निघून जातो आणि मागाहून प्रेतासारख्या असलेल्या नियमांच्या चौकटी तेवढ्या उतरतात. भीष्मानें धर्मयुद्धाचे जे नियम बांधले त्याप्रमाणें फारतर भीष्मच लढला असें मानतां येईल. तो जिवंत असतांना सुद्धां धर्मयुद्धाचे हे नियम काटेकोरपणें पाळले गेले कीं नाहीं अशी शंका ज्यावेळीं यावी असे अनेक प्रसंग घडलेले आहेत.

उदाहरणार्थ भीष्म आणि अर्जुन यांचें युध्द चालू असतां अर्जुनाच कांही चालेना. अशावेळीं एकतर पळून जाणें अथवा मरणें असे दोनच मार्ग अर्जुनासमोर राहिले. पण यावेळीं तिसराच मार्ग कृष्णानें काढला. अर्जुन आणि भीष्म यांचें युध्द चालू असतां कृष्ण आपलें चक्र घेऊन भीष्मावर धांवला. आतां वरीलपैकीं कोणत्या नियमांत ही गोष्ट बसते ? पण आपण या गोष्टीचा विचार कृष्णाची भीष्मावर कृपा असा करतों.

ही जर कृष्णाची भीष्मावर कृपा तर अभिमन्यू कर्णाशीं लढत असतां द्रोणादि लोक त्याच्यावर धांवले ही अभिमन्यूवर त्यांची कृपाच काय ? नाहीं. याला आपण त्यांचें पाप म्हणतों. सहाजणांचें हें पाप सहापट असेल तर एकाचें पाप एकपट तरी आहे ना ! नाहीं. जी नियमबाह्य गोष्ट कृष्णानें केली कीं पुण्य ठरते तीच इतरांनी केली कीं पाप ठरते ! छान नियम !

मला माहीत आहे. अभिमन्यू हा बाळ होता असा विचार प्रत्येकाच्या मनात आहे. पण हा विचार सुतराम बरोबर नाहीं. ज्या ज्ञानेशांच्या बुध्दींतून याच वयांत ज्ञानेश्वरी स्फुरली त्या बुध्दीला काय आपण बालबुद्धि म्हणणार ? अभिमन्यूचा पराक्रम ज्ञानेशांशीं तुल्य असा आहे. युद्धाच्या आरंभापासून अभिमन्यू पराक्रम करीतच होता. पण त्याच्या मृत्यूच्या एकाच दिवशीं अभिमन्यूनें केलेला पराक्रम पहा. त्यानें चक्रव्युहाचा भेद केला. नंतर चतुरंग सेनेचा वध केला. मग अश्मक-



## ध्वजा

कुंदकळ्यांची वेणी, कानीं
लांब बोलके डूल
हंसतमुखीं दिसतसे नवोनव
यौवन चाहूल !
वावरली तर्जनी ठेविली
अधीर ओठांशीं
हंसूं अनावर तरी उमलते
नयनांच्या देशीं
दूर उद्यांचा संसाराचा
कठिण वनप्रान्त
प्राजक्ताच्या जगांत फिरते
दंवांमधें न्हात !
पाहिन ज्याला जिंकिन त्याला
असा मनामधिं आव
तरी मुखावरि शालिनतेचा
स्वाभाविक भाव
या डोळ्यांमधि खळखळणारीं
ओढ्याचीं गाणीं
या डोळ्यांमधिं नील नभांतिल
ताऱ्यांचें पाणी !
सूर्यामधलें घेउन कांहीं
चंद्रामधलें कांहीं—
मूर्त घडविली,–ध्वजा सृष्टिची
लहरत कीं राही !

— वि. म. कुळकर्णी

पुत्राचा वध केला. त्यानंतर शल्यास मुर्छित पाडलें. पुढें कौरव सेनेस उधळून लाविलें. मग शल्याच्या भावास ठार मारलें. पुढें द्रोणाचा पराभव केला. मग रथांची सेना उधळिली. पुढें दुःशासनाचा पराभव केला. नंतर कर्णाचा पराभव केला. त्यानंतर कर्णाच्या भावाचा वध केला. मग कर्णसेना उधळून लाविली. पुढें सत्यश्रवादी शंभर कौरवकुमार ठार मारले. त्यानंतर दुर्योधनाचा पराभव केला. मग दुर्योनाचा पुत्र लक्ष्मण यास उध्वस्त केलें. पुढें क्रथपुत्रांना मारलें. इ. इ.

अशा विश्वविजयी अभिमन्यूस बाल म्हटलेलें त्यालाही आवडणार नाहीं. भीष्म हा वृद्ध असूनही ज्याप्रमाणें पांडवांस वध्य ठरतो त्याचप्रमाणें अभिमन्यू हा बाल असूनही कौरवांस वध्यच ठरतो आणि अर्जुनाशीं लढणाऱ्या भीष्मावर कृष्णानें धांवून जाणें जितपत वध्या नियमानें धर्म वा अधर्म असेल, तितपतच आणि त्याच नियमानें द्रोणादींचें अभिमन्यूवर धांवून जाणें धर्म वा अधर्म ठरणार आहे. शिवाय कृष्ण या अधिक श्रेष्ठ पुरुषानें आधीं उदाहरण घालून दिलें आहे. प्रत्यक्ष कृष्णाच्या हातून भीष्माचा वध होत नाहीं त्याचप्रमाणें या सहांकडून अभिमन्यूचा वध होत नाहीं. (तो दुःशासन पुत्राशीं चाललेल्या गदायुद्धांत होतो) हेंही ध्यानांत घ्यावयास हवें.

उभयपक्षीं असे प्रसंग अनेक आहेत. इथें दोनच तुलनेसाठीं घेतले. ज्यांना काव्य करावयाचें आहे त्यांनीं अभिमन्यूचें बाल्य घोळवून कितीही करूणरस आळवला तरी जे न्यायासनावर बसतात त्यांनीं अभिमन्यूस बाल म्हणणें हा त्या आसनाचा अपमान आहे. त्यांची बुद्धि बाल्यनिरपेक्ष हवी. त्यांनीं हें जाणावयास हवें कीं अभिमन्यू बाल नव्हता तर वीर होता. नुसता वीर नव्हता तर महावीर होता. नुसता महावीर नव्हता तर रथी होता. नुसता रथी नव्हता तर महारथी होता. नुसता महारथी नव्हता तर अतिरथी होता. तत्कालीन वीरांचा परमोच्च दर्जा त्याला लाभलेला होता. तो भीष्म, अर्जुन, कर्ण यांच्या मांडीस मांडी लावण्यास समर्थ होता. 'तुम्हीं युद्ध करणार नसाल तर अभिमन्यूस सेनापती करून मी कौरवांचा नाश करीन' अशी धमकी द्रौपदीनें कृष्णास दिली ती उगाच नव्हती. महाभारताच्या थोर थोर समीक्षकांपेक्षां द्रौपदीची बुद्धि अधिक श्रेष्ठ असल्याचें वारंवार दिसून यावें ही द्रौपदीची केवढी थोरवी नव्हे ?

असो. तर उभयपक्षीं धर्मयुध्दाचे म्हणून जे नियम ठरविले गेले ते उभयपक्षीं कितपत पाळले गेले हा प्रश्नच आहे. कौरवांच्या पक्षानें ते पाळले असा दावा कोणी करत नाहीं. त्याचा विशेष विचार नकोच. तरीही भीष्म, कर्ण, दुर्योधन हे हें युध्द बव्हंशीं तरी न्यायानें लढले असें म्हटलेंच पाहिजे. दुर्योधनास न्याय होता म्हणूनच त्यानें–गदाधरानें गदाधरांशीं लढावें या नियमानें शेवटीं भीमास निवडलें. अन्यथा युधिष्ठिराचें जुगारी जीवन क्षणांत संपविणें त्याला कठीण नव्हतें.

पांडव हे युद्ध धर्मानें खासच लढले नाहींत. भीष्माचा वध करतांना, कृष्ण, अर्जुन, शिखंडी; द्रोणाचा वध करतांना कृष्ण, धर्म, धृष्टद्युम्न; भूरिश्रव्याचा वध करतांना कृष्ण, अर्जुन, सात्यकी; जयद्रथाचा वध करतांना कृष्ण, अर्जुन; कर्णाचा वध करतांना कृष्ण, अर्जुन हे धर्मयुद्धानें न वागतां युद्धधर्मानें वागले, म्हणूनच त्यांचा विजय झाला. अर्थात त्यांत गौण कांहींच नाहीं. पांडवांनी धर्मयुद्ध केलें असा भ्रम कोणी बाळगूं नये इतकेंच. युद्ध हें धर्मयुद्धानें न जिंकतां केवळ युद्धधर्मानेंच जिंकता येतें. कृष्णाला याचा विवेक होता



अनुक्रमणिका








म्हणूनच त्यानें पांडवांस उचित मार्गदर्शन केलें आणि युद्ध जिंकून दिलें.

या ठिकाणीं कधींही विसरली जाऊं नये पण नेहमीं विसरली जाते ती गोष्ट अशी कीं, अभिमन्यू जरी अर्जुनाचा पुत्र होता तरी तो पहिलीं तीन वर्षें फक्त पित्याजवळ होता व शेवटचीं तेरा वर्षें कृष्णाकडे होता. कृष्णानें त्याला वाढविलें, खेळविलें, शिकविलें. त्याला काय अभिमन्यूचा लळा नव्हता ? तो त्याला पुत्रवत् प्रिय असणार. पण कृष्ण अभिमन्यू-वधानंतर शोक करीत नाहीं. Mackbeth नाटकांतील ऐंशीं वर्षें वयाचा सेनापती आपला सोळा वर्षें वयाचा शेवटचा पुत्र लढाईंत मेल्या-वर म्हणतो, 'धंन्य पुत्रा, तूं छातीवर जखम होऊन मेलास, वाहवा'! ही खरी वीरवृत्ती. खरी क्षात्रवृत्ती. दळूबाई गाणीं गाणाऱ्यास हिची जाणीव काय असणार ? त्यांचे अश्रू वहाण्यासाठीं टपलेलेंच असतात. पण कृष्णाला याची जाणीव असते. युध्दाचें खरें धर्म, स्वरूप आणि परिणाम यांचें ज्ञान, त्यालाच असतें. तो रडत नाहीं, तो काय पाषाण असतो म्हणून नव्हे. परंतु युद्धांत या गोष्टी अटळ आहेत याचा त्याला विवेक असतो.

असो. तर भारतीय युध्दाचा विचार करतां त्यांतील अमूक एक प्रसंग धर्म युध्दाचा होता कीं नव्हता याचा विचार न करणें बरें. एखादा प्रसंग या पक्षाचा अथवा त्या पक्षाचा अधर्म दाखविणारा ठरत असला तरी शेवटीं पांडवांचा पक्ष अधिक अधर्मानें लढला असें म्हणावें लागेल. राज्याची हांव हें त्याचें युधिष्ठिराच्या मनांतील कारण मुळीं अधार्मिक आहे याचा आपण पूर्ण विचार केला आहे. पांडव पक्षाचा एकटा भीमच जास्तींत जास्ती निर्दोष योध्दा ठरेल. दुर्योधनाची मांडी फोडीन अशी त्याची प्रतिज्ञाच असल्यानें ती फोडणें हा अधर्म नव्हे. मांडीवर घाव बसणार हें दुर्योधनास माहीत हवें. शिवाय वर जे नियम दिले त्यांत कमरेखालीं घाव घालूं नये असा नियम नाहीं.

अर्थात पांडव जसे लढले त्यांत कांहीं दोष मुळींच नाहीं. द्रौपदीच्या अपमानाचा बदला घेतला गेलाच पाहिजे होता, तो घेतला गेला. उगाच धर्मयुध्दाचा डांगोरा पिटण्यांत अर्थ नाहीं, एवढेंच इथें म्हणावयाचें. (क्रमशः)

●●●










**श**हर पुण्याच्या शनवारवाड्यांत सत्ता होती तर शुक्रवारवाड्यांत शृंगार होता. शनवारवाड्याच्या देशकारण कीर्तिवर दिमाखानं टिच्चून शुक्रवारवाडा डौलानं उभा होता. दिवसेंदिवस शुक्रवारवाड्याचीच शनवारवाड्यावर सरशी होत होती.

सगळा काळाचा गंजीफा. त्याला कुणाचा इलाज नव्हता. ना शनवारवाड्याचा, ना शुक्रवारवाड्याचा. थोरल्या महाराजापासूनच्या महाराष्ट्र धर्माच्या इज्जतीला सांवरण्याचा अनुभवी मातबरांनी यत्न केला पण अखेरीस सगळा काळाचाच गंजीफा.

शुक्रवारवाड्याचे पांच मजले म्हणजे शृंगाराचीं पंचमहाभूतेंच होतीं. आणि त्या सर्वांचे सूत्रधार रसिक पेशवे रावबाजी होते.

संगमरवरी कलाकौशल्याची शुक्रवारवाड्यावर खैरात झालेली भिंतीवरची नक्षी तर सारी हिऱ्या-माणकांची होती. दार-चौकटींना तर हस्तीदंतांची फुलंच फुलं लावलेलीं होतीं. दिव्यांची रंगीबेरंगी छुंबरें सोन्याच्या सांखळ्यांनी मढलेलीं. तिथं उपभोगाच्या मैफलींत रंगाबरोबर गंधहि साथीला होता. ठायीं ठायीं हिऱ्यांचे पेंव फुटलेलें होतें. एखाद्या कर्मठ संन्याशालाहि तिथें आल्यावर संसारभोगी ख्रात्रंसं वाटण्याजोगं तें सारं वातावरण होतं. शुक्रवारवाड्यांत एकच कुठला आयनेमहाल नव्हता तर सारा उभा वाडाच आयनेवाडा होता. बांधणीची रचना मस्त देखणी होती. शुक्रवारवाडा म्हणजे रावबाजींचे ... भग्न होतं...मतालमेच्या चतफ्ल वक्षागतं.

ओजाच्या बाबतींत इतिहासाचा कौल शून्य असला तरी रावबाजी शृंगाराचे शास्त्री होते. त्यांना शृंगाराचा मंत्रहि माहीत होता आणि तंत्रहि माहीत होतें. शृंगारांत त्यांनीं कधी कुणापुढें हार खाल्ली नाहीं. रक्तवंत देखणेपणाचें त्यांना परमेश्वराकडून कृपादानच होतें. आयुष्यांत त्यांनीं विचार केला तो फक्त शृंगाराचाच. शृंगार, शृंगार आणि शृंगारच...भोग, भोग आणि भोगच. साम्राज्याच्या कल्पनेंत रावबाजींची श्रद्धा होतीच पण ती भोगाच्या साम्राज्याच्या...शृंगाराच्या साम्राज्याच्या. जिंकायला भूमि नाहीं म्हणून शिकंदरानें डोळे पुसले तर शृंगारभोगाचा आणखी नवा प्रकार अवगत होत नाहीं म्हणून रावबाजी एकदा रडले. या अश्रुविमोचनांची महती अजोड खरीच. यांत मात्र रावबाजी अद्वितीय होते.

शुक्रवारवाड्याच्या चंपकदालनांत रावबाजी एकटेच उभे होते. शृंगाराला शोभणारा तो देखणेपणा भिंतींच्या व छताच्या आयन्यांतून रास्त प्रतिबिंबित झाला होता. स्वतःच्या रूपाचा स्वतःच रसिकपणानं आस्वाद घेण्याची त्यांना लहर आली होती. तरी ओठांच्या कोनांत स्वतःशी हसतां हसतां रावबाजींचा चेहरा जरा चलबिचलला. जरा जरा म्हणतां चलबिचलपणाची वादळें डोळ्यांतून आडवी तिडवी उधळूं लागलीं. तरण्याताठ्या रावबाजींचं प्रतिबिंब मात्र आयन्यांतून थरकं दिसूं लागलं. पोंक आलेलं, सुरकुतलेली कातडी लोंबणारं, तोंडाचं बोळकं झालेलं, केंस तर निव्वळ गवत पिकलेलं, कांती...गोंडसपणा आकर्षण... ओज...सौंदर... कुठं कुठं...सारं !...




*पुन्हां आयन्यांतून त्या थेरड्यानं राव-बाजींच्याकडे पाहिलं. विकटपणें खदखदून थेरडा हंसला. झटकन रावबाजींनी जानव्यांची गांठ चिमटींत धरली. त्यांच्या पापण्या ताठ झाल्या. सारं कसं शांत झालं. शुक्रवार-वाड्यानं मान खालीं घातली आणि शन-वारवाड्यानं एक दीर्घ सुस्कारा टाकला.*

रावबाजी भानावर आले. आयन्यांतला थेरडा त्यांना विचारीत होता. त्यांनी ओठ आवळले आणि कानांवर हात ठेवले. तरी घणासारखा आवाज कानांत शिरला, 'मला ओळखलेस काय बाजी ?'

पुन्हां आलेल्या त्या प्रश्नानं भानावर आलेले रावबाजी बिनभान झाले...शुक्रवारवाड्याच्या कडेकोट बंदोबस्तातून हा थेरडा आंत आला कसा ?...त्यांना तो नको होता, नको होता. 'चालता हो' रावबाजी तोफेसारखे गरजले. त्या बरोबर तो थेरडा अेवढ्या मोठ्यानं हंसला, अेवढ्या मोठ्यानं हंसला कीं रावबाजींचं तोफेसारखं गरजणं कुठच्या कुठं नाहीसं झालं...आणि रावबाजींच्या मनांत शुक्रवारवाडा निनादून उठला...भोंवताली थेरड्याच्या हंसण्याचा प्रतिध्वनी शिखरा-त्मक झाला...तो आवाज सहन न होऊन रावबाजींनीं स्वतःचें मस्तक दोन्ही पंजात दाबून धरलें...असा अनुभव रावबाजींना यापूर्वीं आला नव्हता. या अनुभवाची जातच आगळी होती...त्यांनीं पापण्याही मिटल्या.

त्यावर घटका सरली. सारं कसं शात झालं होतं.

रावबाजींनी पापण्या उघडल्या.

सभोंवतीं पाहिलं. भिंतीच्या, छताच्या आयन्यांतून त्यांची राजबिंडी प्रतिबिंबेंच विलसत होतीं...थेरड्याचा ठावठिकाणा नव्हता. सारं कसं शांत झालं होतं. तरी घटकाभर ते उभेच होते. ते बैठकीकडे वळले...सारं कसं शात झालं होतं.

आल्या अनुभवाचा विचार करीत रावबाजी बैठकीवर सैल बसले होते. एवढ्यात चाकरानं येऊन मुजरा करून त्यांना सांगितलं, 'सरकार, भोजन तयार आहे.'

'ठीक. आलोंच.'

रावबाजींचं उत्तर मिळाल्यावर चाकर निघून गेला.

भोजनाला जायला रावबाजी बैठकीवरून उठले तेवढ्यांत सरदार दीपकपंत राजवाडे आले. सरदार दीपकपंतांना आलेलें पहातांच रावबाजी बोलायला सुरुवात करणार एवढ्यात राज्याचे कारभारी सदाशिव माणकेश्वरहि आले.

'या या.'

'मुजरा सरकार.'

'तुम्ही दोघे आलांत...फार बरें वाटलें. कां कुणाला माहीत पण चित्तांत आज घालमेल होत आहे.'

'कां बरें ?' सरदार दीपकपंत राजवाड्यांनी विचारलें. ते तर रावबाजींच्या अगदीं मर्जींतले होते.

रावबाजी हंसले आणि गंभीर झाले...पुन्हां हंसले आणि म्हणाले, 'दीपकपंत, या शुक्रवारवाड्याच्या शृंगारयोनीचा विचार करीत असतांना आज एकाएकीं या सभोंवारच्या आयन्यांतली माझी प्रतिबिंबें मला थेरडी दिसूं लागलीं...'

'छे छे छे सरकार, असल्या नाठाळ गोष्टींचा विचार करूं नका. मदनानें मदनासारखेंच वागलें पाहिजे; मदनानें कधीं संन्यासी होऊन जगरहाटी चालणार नाहीं. आपण बोलतो, करतो तें तरी ईश्वराच्या इच्छेप्रमाणेंच ना ? मग दुःख कशाला ? छे छे छे सरकार, अशी कसची तमाच नको.'

'दीपकपंत, योग्य वेळीं आपण योग्य सल्ला दिला आहे. आमची चित्तशुद्धि होऊन विवंचना दूर झाली आहे. काय कारभारी, राज्याची हालहवाल कशी ?' सरदार दीपकपंतांशीं बोलतां बोलतां रावबाजींनी माणकेश्वरांना विचारलें.

माणकेश्वरानी उत्तर केलें, 'कोणाचें हालहि नाहींत आणि कोणाचे हवालेहि नाहींत'

'ठीक ठीक.'

'मुलखांतल्या किल्लेकोटांचे खर्च तोडले आहेत, मामलती मक्त्यानें देण्याचें काम जोरानें सुरूं झालें आहे. नवी घडी बसविण्याचा आटोकाट यत्न चालला आहे.'

'ठीक ठीक. पूर्वाश्रमींचे आपण हरदास तेव्हां आपलें कल्पना-चातुर्य काय वर्णावं ? चला भोजन करतां करतां बोलूं.' रावबाजी म्हणाले आणि चंपकदालनाबाहेर पडले.

रावबाजींच्या बरोबर दोन मातबर आहेत असं कळल्याबरोबर, रावबाजी पंक्तीस येईपर्यंत मातबराच्या भोजनाची लगेच व्यवस्था झाली.

तिघाची पंगत बसली. रावबाजींचें ताट सोन्याचें होतें तर इतर दोघांचीं ताटें चांदीचीं होतीं. ताटाखालीं सागवानी नक्षीदार चौरंग होता आणि बसायला शिसवी पाट होता. चौरंगाभोवतीं रांगोळी काढलेली होती. सुवासाचे घट उघडे ठेवलेले होते.

ताटामध्यें बेत होता केशरीभाताचा. अकरा भाज्या होत्या आणि बारा चटण्या होत्या दुभत्याची तर गंगाच होती.

भुरक्यावर भुरके सुरूं झाले.

दत्ता कदम








'चुकलांत चुकलांत दीपकपंत, भुरका असा मारायचा असतो' असें म्हणत राववाजींनी वाटींतला मठ्ठा चार बोटांच्या चवक्यांत घेतला आणि बेंबीच्या देठापर्यंत भुरका मारला.

तसा भुरका मारण्यांत सरदार दीपकपंत राजवाडयांना यश आलें तेव्हांच राववाजींना समाधान वाटलें.

'सरकार, आपण आहांत म्हणून तरी आस्वाद घेण्याच्या विविध रीती तरी आम्हांला कळूं शकत आहेत. आपल्या आश्रयाला व मर्जीला धन्यवाद द्यावेत तेवढे थोडेच आहेत' असं म्हणून दीपकपंतांनी माणकेश्वरांना विचारलें, 'कसं कारभारी ?'

'योग्य योग्य. तुम्हीं बोलून दाखविलें; आम्हीं बोलून दाखविलें नाहीं एवढेंच.' माणकेश्वरांनीं समयोचित तोंड उघडलें.

राववाजी मोठ्या कुर्ट्यात हंसले व त्यानीं भलायोरला भुरका मारला.

'सरकार, खरोखरी या जगांत कोण कसा आस्वाद घेतो...कोण कसा...'

'काय दीपकपंत'

'या आस्वाद घेण्याची एक जाहीर रीत मी अंग्रेजाकडे पाहिली ती राजकारणाआधीं बोलावी असें वाटतें.'

'सांगा दीपकपंत.' राववाजींनी फर्मावलें.

'खरोखरीं त्या आठवणीनेंहि मनाला मोरपिसी गुदगुल्या होत आहेत. राजकारण करायला अंग्रेजाकडे आपण मला नाताळांत पाठवले हा एक योगायोगच सरकार.'

'आतां सरळ सांगावें. आमची जिज्ञासा वाढवूं नये.'

'सरकार, आजवर कानांनीं ऐकलें होतें पण यावेळीं तें समक्ष पाहिलें.'

'काय दीपकपंत ?'

'सरकार, शृंगाराचा आस्वाद घ्यावा अंग्रेजांनीच'

'छे छे, दीपकपंत लवकर सांगा. जीव गळाला लावूं नका.'

'तसें नाहीं सरकार, आपल्या साऱ्या सुप्त रसिकवृत्ती मदमदून उठतील.'

'तर मग फारच चांगलें. सांगा सांगा लौकर, म्हणाल ती जहागीर द्यायला मी समर्थ आहे.'

'ऐका सरकार, कुठल्याहि स्त्रीच्या कमरेला विळखा घालून अंग्रेज तिच्याशीं सर्वांसमोर नाचूं शकतो आणि...'

'आणि काय दीपकपंत ?'

'आणि......आणि सर्वांसमोर तिच्या ओठांचा मुका घेऊं शकतो.'

'हें सारें ऐकून दिल फडफडायला लागले दीपकपंत. केवढे कमनशिबी आम्हीं...अंग्रेजांच्या देशांत जन्मायचे सोडून...'

'तें आपल्या स्वाधीन नसलें तरी जन्मल्यावर काय करायचें हें तरी आपल्या स्वाधीन आहे. असें निराश होऊं नका सरकार...मग आमच्यासारख्यांचा धीर खचतो.'

'दीपकपंतांचें म्हणणें बरोबर आहे. सरकारांनी त्यावर विचार करावा....' आणि माणकेश्वरांनी दीपकपंतांना विचारले, 'पंत. अंग्रेजाकडे राजकारण कसें झालें ?'

'शृंगाराचा विषय संपल्यावर राजकारणाच्या गोष्टी बोलतां येतील कारभारी. राजकारणांतल्या कलमापासून कसली निष्पत्ती होणार नाहीं पण शृंगाराच्या कलमापासून अनेक कमलें निर्माण होऊं शकतील. वा ! दिल मोहरायला लागले दीपकपंत. अंग्रेजाचा हेवा वाटतो आम्हाला...सारी देवाचीं लेकरें, तर देवानें एकाला एक रुढी तर दुसऱ्याला भिन्न रुढी कां द्यावी ?' राववाजींनीं विचारलें.

'छे छे नसल्या गोष्टींचा उगाच विचार करतां सरकार. पुराणांत तरी देव सोवळा कुठें आहे ? आपण सारे मानव तर त्याचें अनुकरण करणारे आहोंत. म्हणून तर सरकार मी सांगितलें कीं जन्मल्यावर काय करायचें हें आपल्या स्वाधीन आहे. खरोखरीच अंग्रेजापासून फार शिकण्यासारखें आहे,' सरदार दीपकपंत राजवाडे म्हणाले.

'अलबत' सदाशिव माणकेश्वरांनी पंतांना टेकू दिला.

'दीपकपंत, तुम्हीं भाग्यवान कीं असा सोहळा तुम्हांला तुमच्या डोळ्यांनी मनमुराद पहायला मिळाला. तुमचें रूप घेऊन आम्ही अंग्रेजाकडे राजकारणास्तव जायला हवें होतें...तरी दीपकपंत, माणकेश्वर...?...राववाजी एकदम थांबले.

'बोला सरकार,' दोघांनीं म्हटलें.

'शृंगाराच्या आस्वादाची एक सफेजंगी रीत मानसांत येत आहे–

'कोणती सरकार ?' दोघांनी विचारलें.

'सांगतो. दीपकपंत आपल्याला अभय आहे. माणकेश्वर आपल्यालाहि अभय आहे. आपल्या हिंमतीची आम्हांला कुमक हवी.'

'वचन द्या सरकार. सांगाल तें काम फत्ते होईल' दोघेहि म्हणाले.

तें ऐकून राववाजींना आत्मविश्वास वाटला. राववाजी सावकाश म्हणाले, 'बघा, आपल्या सरदारांच्या गरती स्त्रिया लावण्यवती आहेत.'

'मग नाच ?'

'नाहीं दीपकपंत. आपल्याला ओठापर्यंत जाऊन जमणार नाहीं, डोळ्यांपर्यंतच जायचें आहे, कारण...रुढी एकदम तुटत नाहीं...'

'होय श्रीमंत, तेंहि खरें.'

'सरदाराच्या गरती लावण्यवती स्त्रियांना चौरंगावर बसून उघड्यानें न्हातांनीं पाहण्याची आमची इच्छा आहे.'

'आ हा ! सरकारांच्या शृंगाररसिकतेचें कौतुक करावें तेवढें थोडेंच होईल. मनसबा पार पडण्याचा सुदिन उगवेल श्रीमंत.' सरदार म्हणाले...आणि त्यांची धर्मपत्नी त्यांच्या डोळ्यापुढें उभी राहिली. नकळत सरदारांची नजर थोडी तरी नरम झाली.

'सरदार...कारभारी...यास्तव चंपकदालनाची योजना योग्य होईल. प्रत्येक गरती...लावण्यवती चौरंगावर बसेल...चौरंग चंदनाचा असेल...चांदीच्या घंगाळांतून चांदीच्या तांब्यानें ती अंगावर पाणी घेईल...चोळी काढलेली...फक्त नितंबाचें वस्त्र तेवढें राहिलेलें असेल जिकडे तिकडे तिचें मुलायम प्रतिबिंब दिसेल...डोळ्याच्या डोळ्यांनी पाहून घेऊं... बेहोष होऊं...प्रत्येकीला, आम्हीं आमच्या हातानी चोळी– पैठणी पेश करूं...'

तेवढ्यांत धांपा टाकीत महत्त्वाचा खबऱ्या आला. त्यानें घाईघाईनें सांगितलं, 'मुजरा सरकार...सरकार...वसंत गडावरून ताई तेलिणीनें प्रतिनिधींना सोडवून...'

'चालता हो. त्या थेरड्यासारखाच हा कोठून आला ? अंग्रेजांकडचें राजकारण पंतांनी आणलेले आम्ही आधीं ऐकलें नाहीं तर ही खबर ऐकूं ? चालता हो...' राववाजी कडाडले.






अनुक्रमणिका

सगळेच चपापले.

बिचारा खबऱ्या धांपा गिळीत बाहेर गेला.

आणि रावबाजींनी सुरुवात केली, 'तर आम्ही काय सांगत होतो...हो...असा ब्रह्मानंद आम्ही लुटूं...काय दीपकपंत...आ ? काय माणकेश्वर......आपल्या स्त्रिया शुक्रवारवाड्याकडे येतील कीं नाहीं.'

मेलेल्या मनाच्या दोघानांहि पेंच पडला. कांहीं वेळ ते मुके झाले.

रावबाजींनी पुन्हां आठवण दिली, 'कां ! मुके कां ? काम फत्ते करण्याचे आतांच वचन दिलं आहे तुम्हीं...'

त्या मेलेल्या मनाच्या दोघांनीहि होय म्हणून माना हलवल्या आणि श्रीमंतांच्या बरोबर लाघवी भुरके मारले. ती भोजनतृप्ति अनुपम ठरली.

आणि त्या दोघांना पुढें घालून, स्वतःच्या अजब वासनातृप्ती-साठीं इतर सरदारांच्यावर जाळे पसरायला रावबाजींनी सुरवात केली. पण रावबाजींचा हा लंपटपणा अत्यंत हीन ठरला. जहागिरीपायीं मिंधे झालेले सर्व जातीतले सरदार, रावबाजींच्या या शृंगाररीतीनं दुखावले गेले.

'सरदार रास्त्यांना ही विचारणा झाल्याबरोबर, समुद्रहि फिका पडावा असें ते खवळले. म्यान न घेतां फक्त नंगी तलवार घेऊन घोडा फेकीत ते शुक्रवारवाड्यावर आले. रावबाजींना मुजरा न करतांच त्यांनीं विचारलं, 'पेशवाईला पाणी बनवायचा विडा उचलला आहे काय ?'

'सरदार रास्ते, तुम्हीं श्रीमंतांशीं बोलत आहांत. प्रथम मुजरा करा.' रावबाजींनीं दरडावलं.

'मुजरा ! धर्मशील राजाला मुजरा करावयाचा असतो, बृहन्नडेला नव्हे. आदरानें बोलत आहे ही तुमची पुण्याई नव्हे तर पूर्वजांची. माझ्या हातीं नंगी तलवार आहे एवढें ध्यानीं घेऊन बोला. दीड कवडीच्या ज्या लोकांनीं स्वतःच्या स्त्रिया तुमच्या वाड्यावर पाठवण्याची संवय लावली असेल त्यावरून समस्त सरदारांचा अवमान करूं नका. तुम्हीं राज्य काय वाढवतां ? पण आहे तें तरी धर्मानें राखा.'

भीतीनें कांपत असतांनांहि उसने अवसान आणून रावबाजी म्हणाले, 'रास्ते, तुमचा मुलुख मी जप्त करीत आहे...सगळ्यांच्या जहागिरी जप्त करीत आहे...'

'खुशाल जप्त करा. थुंकतो मी त्यावर. निढळांतली चारित्र्याची जहागीर जप्त कराल काय ? कुणाला भीति घालतां ?' म्हणतां म्हणतां सरदार रास्ते एक पाऊल पुढें सरले.

रावबाजींनी दहा पावले मागें सरून आयन्याचा आसरा घेतला.

'खबरदार या चंपकदालनांत कोठली स्त्री न्हायला बसली तर. असला नायक असल्यावर आतां मराठा एक होणें अशक्य आहे. थू:.'

आणि सरदार रास्ते शुक्रवारवाड्यातून बाहेर पडले.

पुन्हां आयन्यांतून त्या थेरड्यानं रावबाजींच्याकडं पाहिलं. विकटपणें खदखदून थेरडा हसला. झटकन रावबाजींनी जानव्याची गांठ चिमटींत धरली. त्यांच्या पापण्या ताठ झाल्या.

सारं कसं शांत झालं. शुक्रवारवाड्यानं मान खालीं घातली आणि शनवारवाड्यानं एक दीर्घ सुस्कारा टाकला.

•••





अनुक्रमणिका



# ध्रुव ढळला

*अमेरिकन नौ-दलांतील अधिकारी **कमांडर जेम्स कल्व्हर्ट** यांच्या धाडसाची आणि दुर्दम्य आशावादाची ही सत्यकथा. हजारों मैल दूर उत्तर ध्रुवावर बर्फाखालून 'स्केट' पाणबुडी नेऊन, कमांडर कल्व्हर्टनें जगाला थक्क केलें, अढळ ध्रुवाला या मानवानें ढळायला लावलें. १९५८ सालच्या ऑगस्ट महिन्यांत घडलेली ही सत्यकथा कमांडर कल्व्हर्ट साहेबांच्याच शब्दांत वाचा......*

अनु : श्रीकृष्ण ठाकूर

१९५८ च्या ऑगस्ट-मधील एक रविवार. सकाळचे दहा वाजले होते. लांब पण कमी उंचीच्या आणि पोलादी भींतीच्या एका खोलीच्या मध्यभागीं एक छोटें टेबल होतें; आणि त्याच्याभोंवती चार माणसें उभीं होतीं. टेबलाचा पृष्ठभाग काचेचा होता आणि त्यावर एक नकाशाचा कागद बसविलेला होता. काच आणि नकाशा यांच्या खालून येणारा एक प्रकाशबिंदू काजव्याप्रमाणें लुकलुकत पुढें पुढें सरकत होता आणि एक मनुष्य त्या प्रकाशाचा मार्ग नकाशावर पेन्सिलीनें रेखाटीत उभा होता. त्या मार्गावर साऱ्यांच्या नजरा खिळल्या होत्या.

त्याच खोलींत करड्या रंगाची एक धातूची पेटी होती. तिच्याभोंवतीं आणखी एक घोळका जमला होता. त्या पेटीलाहि कांचेचें तावदान होतें. आंत एक कागदी पेटी संथ गतीनें सरकत होती आणि खूप जलद लयींत वरखाली होणारी धातूची सळई त्या पट्टीवर एक वेडीवांकडी रेषा काढीत होती. डोंगर–पर्वताची बाह्यरेषा उलटी केल्यावर जसें दिसेल तसें चित्र त्या रेषेंतून उमटत होतें. या रेषेकडे लक्ष लावून उभ्या असलेल्या त्या माणसांपैकीं एकजण खोलींतल्या शांततेचा भंग करीत मोजक्या शब्दांत म्हणाला, 'बर्फ खूप, दहा फूट' नकाशाच्या टेबलावरची पेन्सील त्या प्रकाश बिंदूचा मागोवा घेत पुढें पुढें सरकतच होती.

पण तेवढ्यांत पेटींतल्या सळईनें जवळ जवळ सरळ अशी रेषा काढायला सुरवात केली. 'निखळ पाणी!' तिथून उमटलेल्या आवाजानें आपला आनंद लपविण्याचा अयशस्वी प्रयत्न केला. नकाशाच्या टेबलावर त्या क्षणीं तो प्रकाश बिंदु जिथें होता तिथें लाल फुली मांडली गेली. अशा आणखी कांहीं फुल्या नकाशावर आधींच मांडल्या गेल्या होत्या. या नव्या फुलीमुळें एक चौकोनाकृति पूर्ण होत होती. त्या आकृतीमुळें 'स्केट' पाणबुडीची पाण्यातून पृष्ठभागावर येण्याची पूर्व तयारीहि पूर्ण झाली होती.

अमेरिका राष्ट्राची अणुशक्तीवर चालणारी ही 'स्केट' पाणबुडी आर्टिक महासागराच्या पोटांतून उत्तर ध्रुवाच्या जवळपास प्रवास करीत होती. सागराच्या पृष्ठभागावर बर्फाचा दाट थर मैलोगणती पसरला होता. अशा





अनुक्रमणिका

स्थितींत 'स्केट'ला समुद्राच्या पोटांतून पृष्ठभागावर यायचें होतें.

'स्केट'चा कप्तान या नात्यानें पुढील हालचाली ठरवण्याची जबाबदारी माझी होती. मी नकाशाचें बारकाईनें निरीक्षण केलें. तिथल्या लाल फुलांच्या चौकोनानें सागरी पृष्ठभागाचा जो भाग दाखवला होता तेथें बर्फ नसून पाणी होतें. पाणबुडीचा मार्ग दाखविणारा प्रकाशबिंदु नुकताच त्या चौकोनांत शिरला होता.

'वेग ?' मी विचारलें.

'अर्धा नॉट.'

'खोली ?'

'एकशें ऐंशी.'

'मागें चला.'

पाणबुडीला लावलेले ब्रॉंझचे आठफुटी पंखे उलटे फिरू लागले. तेव्हां सारी बोट सूक्ष्मपणें थरारली. नकाशावरचा उजेड स्थिरावला.

'पूर्ण थांबवा' मी हुकूम दिला. पंखे थांबले.

'पेरिस्कोप वर करा. मला बाहेर पहायचें आहे.'

माझ्या बाजूला उभ्या असलेल्या सडपातळ खलाशानें एक दांडी ढकलली आणि एक पोलादी नळकांडे समुद्राच्या दाबाविरुद्ध झगडत मंदगतीनें आपल्या खोबणींतून वर येऊं लागलें. तें जेव्हां थांबलें तेव्हां मी धातूच्या हँडलची घडी केली व रबरी झरोक्याला माझा डोळा लावला.

पाण्याची स्वच्छता आणि इतक्या खोलवर पाण्यांत झिरपलेला उजेड बघून मी चकितच झालो. बहामा या उष्णकटिबंधांतील प्रदेशाकडील समुद्रांतच पाणी इतकें नितळ असतें. मी पेरिस्कोप उजवीकडे वळवला आणि रंगाचा एक ठिपका नजरेंत आला. आम्हाला सोबती लाभला होता. अतिशय नाजूक, पारदर्शक असा जेलीफीश आपले इंद्रधनुष्यी रंग डौलदारपणें त्या शांत जलाशयांत हलवीत होता. इथं समुद्राचा पृष्ठभाग बाराहि महिने बर्फानें आच्छादिलेला असतो त्यामुळें लाटा नसतात. समुद्राचें पाणी तळ्यासारखें निवान्त राहातें. हा जेलीफीश सोडला तर सगळीकडे हिरवट निळ्या रंगाखेरीज कांहीं दिसत नव्हतं. दृष्टिपथांत बर्फ कुठेंच येत नव्हतं.

'पेरिस्कोप खाली करा.' हँडलची घडी करीत मी म्हणालों. सब-मरीनच्या कंट्रोल सेंटरमधल्या घोळक्याकडे मी पाहिलं. प्रत्येक चेहरा प्रश्नार्थक नजरेनें माझ्याकडे पहात होता. 'एका जेलीफीशशिवाय दुसरं कांहीं दिसलं नाहीं.' मी सांगितलं. ओढून ताणून आणलेलं हास्य त्यांच्या चेहऱ्यावर चमकलं. 'इथं उजेड बराच दिसतोय तेव्हां वर बर्फाखेरीज पाणी असावं,' मी म्हटलं. नकाशाच्या टेबलावरील प्रकाशबिंदू या तांबड्या लाल चौकोनांत मध्यभागीं स्थिर झाला होता. बर्फ शोधणाऱ्या पेटीसमोर असलेल्या माणसांना मी म्हटलं, 'कसं काय दिसतंय् ?'

त्यांतील प्रमुखानें माझ्याकडे निर्विकारपणें पाहिलं. त्यानें आपला डावा हात वर केला आणि अंगठा व एक बोट यायोगें एक वर्तुळ करून दाखविलं.

आतां वेळ झाली होती.

सर्वांच्या नजरा पाणबुडी वरखालीं नेणाऱ्या माणसांवर आणि निळ्या डोळ्यांचा, कुरळ्या केसांचा, डोइलगत केस कापलेल्या लेफ्टनंटकडे —डायव्हिंग ऑफीसरकडे वळल्या. समुद्रसपाटीच्या खालीं १८० फुटांवर, निःस्तब्ध स्थितींत स्केट उभी होती तीं त्याच्यामुळेंच. ही त्याची कामगिरी फार नाजुक असली तरी आतां यापुढें त्याला जें करावयाचं होतं त्या मानानें ती कांहींच नव्हती.

मनांत नसलेला आत्मविश्वास आवाजांत पूर्णपणें दर्शवीत मी त्याला म्हटलं, 'सावकाशीनं पृष्ठभागापासून शंभर फुटापर्यंत चल.'

आणि मग डायव्हिंग ऑफीसरच्या सूक्ष्म सूचनेनुसार ती तीन हजार टन वजनाची पाणबुडी अवाढव्य बलूनप्रमाणें हळूहळू वर येऊं लागली. पाण्याच्या पुष्कळ खालीं असल्यामुळें आतांपर्यंत आम्हाला बर्फाचा धोका नव्हता. पण आतां जाणून बुजून आम्ही ही पाणबुडी वरती–धोक्याच्या ठिकाणीं–नेत होतों. माझं हृदय धडधडूं लागलें. पेरिस्कोप परत वर करण्याचा मी हुकूम दिला. 'स्केट वर जात असतां वेळोवेळीं समुद्रसपाटीपासूनची खोली सांगा' मी माझा डोळा झरोक्याला लावीत असतां डायव्हिंग ऑफिसरला सांगितलं. बाहेर पाण्याशिवाय दुसरं कांहींच दिसत नव्हतं. तो जेलीफीश सुद्धां कुठेंतरी गेला होता.

'एकशेंचाळीसवर केलेल्या पेरिस्कोपचें वरचें टोक पाणबुडीच्या तळापासून साठ फूट उंचावर होतें. म्हणजे वर आतां फक्त ऐंशी फूट पाणी होतें. बर्फाच्या खालची बाजू तर त्याहूनही कमी अंतरावर होती. पण अद्याप बर्फ कसं दिसत नाहीं ? आश्चर्य आहे ! खोलीमध्यें नीरव शांतता होती, बर्फ शोधणाऱ्या यंत्राचा 'सूस्' असा चमत्कारिक आवाज ऐकूं येत होता. मी पेरिस्कोप सभोंवती फिरविला पण कांहींच दिसेना.

'एकशेंवीस' पेरिस्कोपचा वरचा भाग समुद्रपृष्ठाच्या खाली फक्त साठ फूट होता. मला एकाएकीं महाभयंकर वाकड्या तिकड्या बर्फखंडांची आकृति दिसूं लागली. भीति वाटण्याइतकें जवळ. मी घाईघाईनें पेरिस्कोपचा मोहरा समुद्राच्या पृष्ठभाकडे वळला. मघाचाच धूसर हिरवा–निळा रंग दुसरं कांहीं नाहीं. टाकीमध्यें घुसणाऱ्या पाण्याचा आवाज ऐकूं येत होता. वर जाणारी पाणबुडी डायव्हिंग ऑफिसर थांबवीत होता. जर त्याला हें जहाज इथंच थांबवितां आलं नाहीं तर काय अनर्थ होईल याचा विचार माझ्या मनाला चाटून गेला.

पाणबुडीची गती कमी झाली आणि ती शंभर फुटांवर थांबली.

माझ्या कल्पनेप्रमाणें सरळ आमच्या माथ्यावरती कांहीं बर्फ नव्हतं. पण आम्ही योग्य ठिकाणींच उभे आहोंत कीं नाहीं याची खात्री आम्हाला नव्हती. नकाशांतल्या तांबड्या तांबड्या फुल्या आम्हाला सांगत होत्या–कीं माथ्याच्या दिशेनें सरळ आम्ही वर गेलों. आणि बर्फांतल्या त्या तळ्याच्या अगदीं मध्यभागींच वर उमटलों, तरच आमची बोट कशीबशी बर्फाला न धरतां सुरक्षित रहाणार होती. बरें बोट अतिशय सावकाशीनं वर आणणं



संवयीचा हात !

घर्षणाचं होतं. कारण तसं करताना ती आजूबाजूस सरकून बर्फाच्या कड्याना घासली जाण्याची शक्यता होती. उलट टाक्यामधलं पाणी काढून टाकून एखाद्या बुचासारखं फटकन् वर येणंहि मूर्खपणाचं होतं. बोटीच्या पातळ नळीवर जर का पृष्ठभागाचं बर्फ घासून भोक पडलं तर आंतील सर्वांसकट बोटीस जलसमाधी मिळती.

पाण्याखालीं असलेली बोट जर का पुढें-मागें जात नसेल तर ती प्रचंड अशा फुग्या-सारखी भासते. ती पुढें सरकत असते त्यामुळेंच तिला आपली पाण्याच्या पृष्ठभागापासूनची खोली टिकवतां येते किंवा कमी जास्ती करतां येते. आणि जर का ही हालचाल थांबली तर पाणबुडी तिच्याप्रमाणें उचंबळून वर तरी येईल अगर खालीं तरी जाईल. आम्ही या क्षणीं बर्फाच्या खालीं डायव्हिंग ऑफीसरच्या कौशल्यावर पूर्णतया विसंबून पूर्वनियोजित गतीनें सरळ वर जाणार आहोंत. यापूर्वी अशा कामासाठीं पाणबुडयांची बांधणी कधींच झाली नव्हती.

माझ्या कपाळावर घामाचा एक थेंब उमटला. मी सभोंवार पाहिलं. प्रत्येकाची नजर माझ्याकडे लागली होती. माझ्या अंतर्मनी कांहींहि खळबळ चालो, बाहेरून मी शांत आणि निश्चयी दिसलं पाहिजे. मी डायव्हिंग ऑफीसरकडे वळून म्हटलं. 'ठीक आहे. बोट वर ने. शक्य तितक्या कौशल्यानं आणि सहजतेनं पाण्याबाहेर काढ आणि वर जाताना प्रत्येक वेळीं आपण किती फुटांनीं वर चढत आहोंत तें सांग.' आम्ही परत सावकाशीनं वर चढूं लागलों.

'नव्वद फूट' आतां पेरिस्कोप पाण्याखालीं अवघा तीस फूट होता. आतां इथपासून वर जातांना आम्हाला कांहीं पाहतां येणार नाहीं. पेरिस्कोप वरती बर्फाला आपटून बोटीचा हा नाजुक, एकुलता डोळा मोडण्याची, फुटण्याची, वाकण्याची शक्यता आहे.

'पेरिस्कोप खालीं कर' मी सांगितलें आणि पेरिस्कोपची बारीक नळी 'सू सू' आवाज करीत खाली आली व जहाजाच्या खोबणींत सुरक्षित जागीं जाऊन बसली.

'ऐंशी फूट', डायव्हिंग ऑफीसर लयबद्ध स्वरांत म्हणाला, 'सत्तर फूट' तो इतका शांत कसा काय राहूं शकतो ?

पूर्वसूचना न देतां बोटीची वर जाण्याची गती एकदम वाढूं लागली. मी पुढें झालों. ओरडून धोक्याची सूचना देणार, तेवढ्यांत काय होतंय् तें जाणून मी गप्प राहिलों. डायव्हिंग ऑफीसर स्केटची वर जाण्याची गती रोखण्यासाठीं बोटीच्या टाक्या भरीत होताच. पण त्याचा कांहीं उपयोग नव्हता. आम्ही आतां जास्त थंड आणि जास्त खारट पाण्याच्या थरापर्यंत आलों होतों व त्यामुळें आम्ही अति जलदपणें वर जात होतों.

'पंचावन्न फूट' डायव्हिंग ऑफीसरनें बातमी दिली. आतां त्याच्या आवाजांत खरी काळजी उमटली होती. आम्ही वर बर्फाला किंवा इतर कशाला धडकी देणार असूं तर ती आतांच. पण बर्फावर आपटण्याचं कांहीं चिन्ह दिसेना. पाणबुडी चाळीसाव्या फुटावर आली, क्षणभर तिथें थांबली व परत चाळी-साव्या फुटापर्यंत खालीं गेली.

> ### कोण म्हणतो ह्याला बुटका ?
>
> सैन्यांतील भरतीसाठीं अर्जदाराची उंची कमीतकमी ५ फूट ६ इंच हवी अशी एक अट घालण्यांत आली होती. अर्जदारांमध्यें एक उमेदवार बुटका होता; ज्याची उंची आवश्यक उंची इतकी निश्चित नव्हती. त्याला पाहून एका अधिकाऱ्यानें त्याला खोचकपणें विचारलें, 'बुटक्या माणसा, तुझी उंची किती आहे रे ?'
>
> त्या उमेदवारानें खांदे ताठ करून उत्तर दिलें,—' नेपोलियनपेक्षां चार इंच जास्त, साहेब !'

'पंचेचाळीस फूट—बोट थांबली आहे' डायव्हिंग ऑफिसरनें आपल्या नेहमीच्या शांत–सपाट आवजांत सांगितलें.

आतां परिस्कोप वर करावयास हरकत नाहीं असा विचार करून मी 'पेरिस्कोप वर करा' असं सांगितलं आणि पेरिस्कोपची चकचकीत पोलादी नळी वर सरकूं लागली. बोट खोलवर असतानां पेरिस्कोप कसाबसा डगडगत वर जायचा. त्या मानानं आता तो वेगानें सरळ वर जात होता.

मी सभोंवती पाहूं लागलों. झगझगीत उजेड दिसूं लागला. पेरिस्कोपचा वरचा भाग समुद्र-पृष्ठ भागावर स्वच्छ हवेंत होता. प्रचंड अशा बर्फाचे तुडलेले कडे, बर्फाचे खंड यांनीं बस-लेला तळ्याचा कांठ मला दिसूं लागला. चारी बाजूनी बर्फ भीति वाटण्याइतकं जवळ दिसत होतें. पण लगेच माझ्या ध्यानांत आलं की पेरिस्कोपमधून अगदीं जवळची वस्तू पहायची आम्हांला अद्याप सवय नाहीं.

मी पेरिस्कोपचा लोलक खालच्या बाजूला वळवला. नजरेच्याहि टप्प्यापलीकडे बर्फाची उंचसखल मैदानं होतीं आणि बोटीच्या व बर्फाच्या कड्यांच्यामध्यें निळं भोर पाणी लह-रत होतं.

अद्याप आम्ही पाण्याच्या खालीं पंचेचाळीस फूट होतो. बर्फापासून मागचं पुढचं अंतर मी काळजीपूर्वक मोजलं. आम्ही जराहि पुढें अगर मागे सरकलों नाहीं तर पृष्ठभागावर आम्हाला येण्याची शक्यता होती.

'पाण्यावर यायला सज्ज व्हा !' लाउड-स्पीकरमधून सर्व बोटींत संदेश गेला. साऱ्या बोटींत एकच धमाल उडाली. शब्द माझ्या तोंडातून बाहेर पडेपर्यंत कंट्रोल रूमच्या बाहेर असलेल्या ऐंशीं माणसांपैकीं एकासही आपण नक्की कुठें होतों अगर कशा स्थितींत होतों याची कल्पना नव्हती.

सर्वजण आपापल्या कामांत दंग झाले आणि स्वीचेस उघडले गेले, बंद केले गेले. डायव्हिंग ऑफिसरकडे रिपोर्टस् गेले. शेवटीं माझ्याकडे वळून तो म्हणाला, 'सर्व दारें बंद केलीं आहेत. वर जाण्याची सर्व तयारी पूर्ण झाली आहे.' मी संमतिदर्शक मान हलविली; तेव्हां त्यानें हुकूम सोडला 'सर्व टाक्या मोकळ्या करा.' आतां आदेशाची कांहीं जरुरी नव्हती. आतां आम्ही पूर्ण जाणिवेनें तें करीत होतों.

गेले कित्येक तास आम्ही शांततेंत घालविले होते. त्यामुळें आतां रिकाम्या टाक्यांत घुस-णाऱ्या हवेच्या दाबाचा झोत कान फोडून जात होता. स्केट हळूंच वर आली. पण तें काम इतक्या कौशल्यानं केलं गेलं कीं बोट एक फूटहि मागें वा पुढें सरकली नाहीं.

'बोटीचा टप उघड.' मी नोकराला ओर-डून सांगितलं. त्यानें हँडल फिरवलं आणि झडप उघडतांच आंत स्वच्छ हवा आली. आम्ही पाऊल बाहेर टेवतांच ओलसर थंड हवेचा झोत, आमच्या अंगावर आपटल्या-सारखं वाटलं. आकाशांत किंचित् अभ्रं होतीं त्यामुळें न्यू इंग्लंडमधील फेब्रुवारी महिन्यांतील बिनमोसमी उन्हाळ्यासारखी हवा भासली. वारा जवळ जवळ नव्हताच.

आम्ही झटकन् बोटीच्या टेहळणी पुलावर चढलों. प्रथम वाटलं कीं अनंत अशा बर्फाच्या









वाळवंटांत आम्ही उभे आहोंत. प्रत्येक दिशेनें वाहत्या बर्फाचे सपाट पट्टे जाताहेत असें दिसत होतें. आमच्यासमोर पाणबुडीची काळीकुट नाळ, खालीं समुद्राचं निळंनिळं पाणी व सभोंवार पांढरा शुभ्र बर्फ. स्केट आर्क्टिक महासागराच्या पृष्ठभागावर, उत्तर ध्रुवाजवळील बर्फमय प्रदेशांत उभी होती. आणि ती सुरक्षित होती. मी एक दीर्घ श्वास सोडला, तो जहाजाच्या तळापर्यंत जाऊन पोचला असावा.

माझ्याबरोबर बाहेरील दृश्याचं आकंठ पान करीत असलेल्या माझ्या सहकाऱ्यानें झटकन् खालीं बोट दर्शविलं. तिथून बर्फाच्या कडेनें एक पूर्ण वाढ झालेलं बर्फमय प्रदेशांतील अस्वल पाण्याबाहेर चढत होतं. पाण्यांत भिजलेल्या कुत्र्यानं आपलं अंग झटकावं तसं त्यानें केलं व तो आमच्याकडे कुतुहलानें पाहूं लागला. कदाचित् आयुष्यांत त्यानें प्रथमच मनुष्य पाहिला असावा.

ह्या बावरलेल्या, उत्तर ध्रुवावरील बर्फमय प्रदेशांत रहाणाऱ्या अस्वलाला भेटण्यासाठीं मी कितीतरी अंतर कापून पृथ्वीच्या ह्या वरच्या बाजूला आलों होतों. तीन वर्षांच्या खडतर पूर्वतयारीचं प्रत्यक्ष फळ म्हणजे ही सफर. सुरुवातीला मला ह्या आर्क्टिक प्रदेशाविषयीं माहिती फारच थोडी होती—आणि मला कबूल केलं पाहिजे—कीं पर्वा तर मुळींच नव्हती.

१९५५ च्या वसंतऋतूंत अमेरिकेच्या 'ट्रिगर' ह्या पाणबुडीवर मी, दोन वर्षांपेक्षां जास्त काम केलं होतं. माझ्या कप्तानकी-खालची ही पहिली पाणबुडी. नुकतीच माझी पर्ल हार्बरला बदली झाली होती व माझी पत्नी नॅन्सी व आमची मुलं यांना पर्ल हार्बरचे पामवृक्ष आणि अननसं यांचं आकर्षण वाटत होतं. मलाहि पर्ल हार्बरचं तसं आकर्षण नव्हतं असं नाहीं.

मला निघायला थोडे दिवस राहिले असतां अटलांटिकमधील पाणबुड्यांच्या काफिल्याचे प्रमुख रेअर ॲडमीरल फ्रँक वॅटकिन्स यांच्याकडून मला बोलावणं आलं. त्यांनीं मला सांगितलं कीं मी ॲडमीरल रिकोव्हर यांना वॉशिंग्टनमध्यें भेटावं अशी त्यांची इच्छा आहे व माझ्याबरोबरची त्यांची मुलाखत जर समाधानकारक झाली तर मला त्यांच्यासाठीं काम करावं लागेल.

मी चकितच झालों. ॲडमीरल रिकोव्हर कोण हें न्यू लंडनमध्यें प्रत्येकाला माहीत होतें. अणुशक्तिवर चालणाऱ्या 'नॉटिलस' चें आश्चर्यकारक सुयश पाहून पाणबुडीच्या जगाला जणुं विजेचा धक्का बसला होता. प्रचंड विरोधाला न जुमानता ती बांधून घेणारे फटकळ स्वतंत्र बुध्दीचे ऑफिसर ॲडमीरल रिकोव्हर यांच्या या विजयानें त्या जगाला स्तिमित केलें होतें.

माझा विश्वासच बसेना. मी त्यांना विचारलं, 'त्यांच्यासाठीं काम करावं लागेल' म्हणजे काय ? मी काय करायचं ? मी कांहीं इंजिनिरिंगचा तज्ञ नाहीं आणि अणुभट्टीची तर मला कांहींच माहिती नाहीं. एकटक नजरेनें ॲडमीरल वॅटकिन्सनी माझ्याकडं पाहिलं. 'जिम्, तुला निदान एक गोष्ट चांगली येते. ती म्हणजे पाणबुड्या बोटींचं नेतृत्व.



चोरावर मोर !

आणि रिकोव्हरला कदाचित् त्याचंच महत्व वाटेल. तूं आतां मिळेल त्या गाडीनं वॉशिंग्टनला जावंस असं मला वाटतं.'

मी तेंच केलं.

दुसऱ्या दिवशीं मी वॉशिंग्टनमधील गबाळ्या दिसणाऱ्या, करड्या रंगाच्या 'ॲटोमिक एनर्जी कमिशन' नामक बिल्डिंगमधें शिरलों. मोठ्या खोलींत जावयाच्या छोट्या खोलींत मी एकटाच होतों. मी आल्याची वर्दी दिली तेव्हां मला बसण्यास सांगण्यांत आलं. मी वाट पाहत बसलों. जवळजवळ दोन तास निघून गेले. माझी अस्वस्थता वाढूं लागली. पाणबुड्यांच्या विश्वांत ॲडमिरल रिकोव्हरविषयीं कितीतरी गोष्टी बोलल्या जात. त्यांच्या हाताखालीं ज्यांना ज्यांना काम करायचं आहे त्या प्रत्येकाची ते स्वतः कसून चांचणी घेतात. मला कळलं कीं चांचणीसाठीं पुष्कळांना बोलावतात, पण फारच थोडे निवडले जातात. आणि कुणीहि उमेदवार त्यांच्या समवेत झालेली आपली चांचणी परीक्षा विसरत नाहीं. थोड्याच वेळांत मला त्यांच्या खोलींत बोलावण्यांत आलं तेव्हां जास्तांत जास्त वाईट झालें, तरी त्यासाठीं मी माझ्या मनाची तयारी ठेवली.

शुभ्र केसांचे सडपातळ ॲडमीरल रिकोव्हर नागरी पोशाखात होते. मागाहून मला आढळून आलें कीं ॲडमीरल शक्यतों गणवेश घालावयाचें टाळतात. माझ्याशीं हस्तांदोलन करून त्यांनीं मला बसावयास सांगितलं. ऑफीसमधें मी सभोंवार नजर टाकली. दालनाच्या मध्यभागीं असलेल्या टेबलावर कागद पत्रें, कागद याबरोबरच अर्धवट रिकामा कॉफीचा कप होता. दालनाच्या तिन्ही बाजूला पुस्तकांनीं भरलेलीं गच्च शेल्फ होतीं.

'कल्व्हर्ट, तुझं वय किती ?' त्यांनीं पटकन् मला प्रश्न केला.

'चौतीस' मी म्हणालों.

'कुठल्या शाळेंत शिकलास ?'

मी ओहिओ येथील माझ्या छोट्या हायस्कूलचं वर्णन केलं. ओबरलिन कॉलेजातील माझीं दोन वर्षें—तीं सांगितलीं. लौकरच आम्ही माझ्या ॲनापोलिस (नौदल शिक्षण केंद्र) येथील वर्गांतल्या स्थानाविषयीं बोलूं लागलों. 'सहाशें मुलांत जवळ जवळ शंभरावा' मी थोड्याशा अभिमानानें सांगितलं.

'इतका खालीं कां ?' ॲडमीरलनीं चपराक मारली. या अनपेक्षित प्रश्नावर काय उत्तर द्यावें याचा मी विचार करूं लागलों, एवढ्यांत कुणीतरी आंत आलं आणि त्यानें ॲडमीरलच्या हातांत एक कार्ड दिलं. त्यांनीं त्या पत्राकडे निर्विकार नजरेनं पाहिलं आणि आपल्या टेबलावरचा फोन उचलला.

रिकोव्हर यांच्या ज्या योजना चालू होत्या त्यासाठीं लागणारा माल पुरविणाऱ्या एका कंपनीच्या अध्यक्षाशीं ते टेलिफोनवरून बोलत होते. त्या कंपनीचे अध्यक्ष, ती कंपनी आणि त्यांचा माल ह्या सर्वांवर ॲडमीरल नाखुष झाले होते हें स्वच्छ होतें. ॲडमीरल यांचा आवाज चढत होता आणि चेहरा तांबडा लाल होत होता. मी भयचकित होऊन पहात होतों. शेवटीं ते उभे राहिले व त्यानी एवढ्या जोरानें मूठ आपटली कीं टेबलावरील सर्व वस्तू क्षणभर थरथरल्या.

माझा थरकाप उडाला. एवढा भडका उडाल्यावर बहुधा थकल्यामुळें किंवा वाईट

अनुक्रमणिका

मनःस्थितीमुळं मला न जायला सांगतील, याची मला खात्री वाटूं लागली. टेलिफोन अतिशय जोरानें खालीं आपटला गेला व ॲडमीरलनी माझ्याकडे लक्ष वळवलं. अगदीं पूर्ण शांत स्वरांत व चेहऱ्यावर यत्किंचितहि रागाचा भाग न दर्शवितां त्यानीं बोलावयास सुरवात केली. 'हं मग नेव्हल स्कूलमधें तुझा नंबर एवढा खालीं का गला ?'

स्वतःच्या मनावर काबू ठेवण्याचं काय हें कौशल्य ! नुकताच झालेला त्यांच्या भावनांचा उद्रेक मी पाहिला होता आणि आतां कांहीं क्षणाच्या आत ते पूर्णपणें शांत झाले होते. मी अस्वस्थ मनानें पुढें सरकलों व म्हणालों, त्याचं असं झालं...

'काय तें मी सांगतो.' रिकोव्हर म्हणाले, 'एक तर तूं मंद असावास अगर आळशी. यांतलं कोणत खरं ?'

ॲडमीरल माझ्यांतल्या उणीवांकडे कठोरपणानें पहात असतां, माझ्या या चांचणीत मी इतका मागे का पडतोय ह्याचं एक कारण माझ्या लक्षात आलं. आपल्यापैकीं पुष्कळजण संभाषणामध्यें नको असलेल्या सत्य विषयावर चटकन् बोलण्याचें टाळतात. रिकोव्हर याच्या उलट करतात. एखादा विषय जितका नकोसा असेल—अप्रिय असेल, तितके ते त्यांत चटकन् शिरतात. 'दरमहा तूं किती पुस्तकं वाचतोस ?' ते आता मला विचारीत होते.

'जवळजवळ दोन.' मी खरं तें सांगितलं.

'अलीकडचीं चार पुस्तकं कोणतीं ?'

मी त्यांचीं नावं सांगितलीं. त्यानीं तीं चारी वाचली होती.

'कॅलव्हर्ट, तूं गोल्फ खेळतोस ?' ज्या स्वरांत एखाद्याला तू मादक द्रव्याचें व्यसन करतोस काय ? ' असं विचारावं त्याच स्वरांत त्यानी मला हा प्रश्न विचारला.

ओशाळलेल्या स्वरात मी कधीमधीं खेळत असल्याच कबूल केल.

'छान, फारच छान.' ॲडमीरल खंवचटपणें म्हणाले, 'तूं म्हणतोस कीं तुला वेळ पुरत नाहीं म्हणून आणि तरीहि तू गोल्फ खेळून 'तासचे तास मोफत घालवतोस.' माझ्याकडे बारकाईनं पहात ते म्हणाले, 'तुझ्याकडे टेलिव्हिजन सेट आहे का ?'

असहाय्यपणें मी होय म्हणालों.

'छान——ठीक आहे.' मुलाखत संपवीत ते म्हणाले.

पराजित मनुष्यासारखा मी त्यांच्या ऑफीसमधून बाहेर पडलों.

त्याच दिवशीं सायंकाळीं पुष्कळ उशीरां मी न्यू लंडनला परतलों.

मी दुःखित अंतःकरणानं नॅन्सीला सांगितलं. 'माझी मुलाखत झाली त्याहून आणखी काहीं वाईट होऊं शकली नसती. नॅन्सी, त्या गृहस्थाला वाटलं, मी म्हणजे केवळ गोल्फ खेळणारा एक खुशालचेंडू आहे.'

'पण तुम्हांला वाटतें तितकी तुमची मुलाखत वाईट झाली नसणार.' माझं सांत्वन करण्याच्या उद्देशानें ती म्हणाली.

## 'सैनिकाला अशीच तब्येत लागते !'

सैन्यासाठीं भरती चालू होती. जो दिसेल त्याला पकडून आणून वैद्यकीय तपासणीसाठीं उभं करण्यांत येत होतं. एका तरुणाला डॉक्टरांपुढें उभं करण्यांत आलं. तो कमालीचा घाबरला होता. त्याला सैन्यांत दाखल व्हायचं नव्हतं. तो डॉक्टरांना म्हणाला, 'माझं वय ३३ आहे. मी नवरा आहे एका बाईचा. दोन मुलांचा बाप आहे मी. आणि मुख्य म्हणजे माझी प्रकृती फार अशक्त आहे. मी सारखा आजारी पडतों. मी स्वभावानें फार हळवा आहे व चंचलवृत्तीचा आहे. मी कधींही उत्तम सैनिक होऊं शकणार नाहीं. कारण सैन्यांतील लोकांबद्दल मला विलक्षण चीड आहे.'

त्याचं हें बोलणं झाल्यावर डॉक्टर शांतपणें त्याला म्हणाले, 'म्हणजे तुला तपासण्याची जरूरी नाहीं. सैनिकाला अशीच तब्येत लागते !'

'ही एकच वेळ तूं साफ चुकणार.' मी ठामपणें म्हणालों.

दुसऱ्या दिवशीं जेव्हां मी 'ट्रिगर' वर चढलों तेव्हां ड्यूटी ऑफिसरनें माझ्याकडे आरमार खात्याकडला एक खलिता दिला. त्यांत लिहिलं होतं,

'बावीस जानेवारीचा हुकूम रद्द × यु. एस्. एस्. ट्रिगरच्या जबाबदारींतून मुक्त होताच तडक वॉशिंग्टन येथें येऊन यु. एस्. ॲटॉमिक एनर्जी कमिशनच्या आरमारी अणुभट्टी प्रमुखासमोर हजर व्हावें.'

ॲडमीरल रिकोव्हर यांच्या कचेरींतून मी बाहेर पडलों, त्यानंतर थोड्याच तासांत हा हुकूम काढण्यांत आला होता.

मे १९५५ मध्यें जेव्हां मी आरमारी अणुभट्टी शाखेंत दाखल झालों तेव्हां ती संस्था सहा वर्षांची झालेली होती. एवढ्या काळांत संस्थेनें संस्मरणीय यश मिळविलें होतें. आणि एखादा सरकारी विभाग जितका एकखांबी असूं शकेल तितक्या कमाल मर्यादेपर्यंत हा विभाग एक माणसाच्या खांद्यावर आधारलेला होता.

दुसऱ्या महायुद्धामध्यें कॅप्टन एच्. जी. रिकोव्हर यानीं 'नेव्हीज ब्यूरो ऑफ शिप्स्' येथें इलेक्ट्रिकल विभागाचं प्रमुखत्व विलक्षण कर्तबगारीनं आणि अप्रियतेची पर्वा न करतां केलं होतं. १९४६ मध्यें ओकरीज येथें अणुशक्तीचा शांततापूर्वक उपयोग या विषयावर चर्चा करण्यासाठीं जीं माणसं बोलाविलीं होतीं त्यापैकीं ते एक होते. पाणबुडीच्या ज्या तात्रिक मर्यादा आहेत त्या ओलांडता आल्या तर पाणबुड्यांचा आणखी कितीतरी मोठ्या प्रमाणावर उपयोग होण्यासारखा आहे असं रिकोव्हर यांचं फार पूर्वीपासून मत होतं. आकेरीन येथें त्यांच्या लक्षांत आलं कीं पाणबुड्यांच्या बाबतींत त्यांना जें पाहिजे होतं तें अणुशक्तिमुळें मिळण्यासारखें आहे आणि लौकरच अणु-शक्तीनें चालणाऱ्या पाणबुडीच्या कल्पनेनें त्यांना झपाटून टाकलें.

ही कल्पना प्रत्यक्षांत आणण्याआड येणाऱ्या शास्त्रीय व राजकीय अडचणी एवढ्या प्रचंड होत्या कीं एखाद्या सामान्य मनुष्यानें ही कल्पना केव्हांच सोडून दिली असती. ज्यावेळीं रिकोव्हर परत वॉशिंग्टनमध्यें आले तेव्हां त्यांच्यापाशीं पैसा नव्हता, अधिकार नव्हता, अगर त्यांच्या शब्दाला वजनहि नव्हतें जें काय होतं ती एक भव्य कल्पना, दृढनिश्चय आणि अविचल धैर्य. आठ वर्षेंपर्यंत ते या कल्पनेसंबंधीं बोलले, वादविवाद केला, योजना आखल्या आणि विरोधकाशीं दोनं हात केले. जानेवारी १९५५ मधे नॉटीलस ही अणुशक्तिवर चालणारी जगांतली पहिली बोट समुद्रांत शिरली.

याजबरोबर रिकोव्हरनीं आणखी एक स्मरणीय गोष्ट केली ती म्हणजे ब्युरो ऑफ शिप्स आणि ॲटॉमिक एनर्जी कामिशन या दोन संस्थांमध्यें स्वतःला मानाचं स्थान प्राप्त करून घेतलं. दोन्ही संस्थांमध्यें अणुभट्ट्या तयार करण्याच्या कामाचे ते प्रमुख होते. ●●●

अनुक्रमणिका



*प्रस्तुत छोट्या छोट्या कथा भारतीय फौजेतील एका सेवानिवृत्त अधिकाऱ्यांनीं खास दीपावली-साठीं लिहिल्या आहेत. लेखकानें त्या स्वतः अनुभवल्या आहेत. आज भारताच्या उत्तर सीमेवर चीन आक्रमक पावलें टाकीत आहे. पंचशील तुडवीत आहे. आपले जवान देशाचे रक्षण प्राणपणानें करीत आहेत. या पार्श्वभूमीवर प्रस्तुत चित्तथरारक सत्यकथा वाचतांना वाचकाला क्षणभर श्वासहि रोधावा लागेल यांत शंका नाहीं—*

# युद्धस्य कथा

## चहापार्टी

30 वर्षांपूर्वीची गोष्ट. आमच्या पंजाबी पलटणीचे सुभेदार मेजर (सगळ्यांत वरिष्ठ, व्हाइसराय कमिशनचे अधिकारी) सेवानिवृत्त होऊन पेन्शनवर जाणार होते. त्यांच्याकरितां इतर व्हाइसरॉय कमिशन ऑफिसर्सना एक निरोप समारंभ योजिला होता. चहापाणी व नंतर भाषणें असा बेत, नेहमींच्या शिरस्त्या-प्रमाणें ठरला होता.

त्या दिवसांत पलटणीमधील उर्दू म्हणजे पर्शियन भाषेची मेजवानीच असावयाची. अर्थातच तीं भाषणें पंजाबी किंग्स कमिशन ऑफिसर्स शिवाय बहुतेक कोणालाच समजत नसत. फक्त एक अपवाद होता आणि तो म्हणजे पलटणीचे हेडक्लार्क. ते बरेच दिवस आधीपासून एखादा लेख लिहिण्यास मेहनत लागेल इतकी बुद्धि खर्च करून दोन्ही भाषणें तयार करावयाचे. कर्नलसाहेबांचें निरोपाचें भाषण उर्दू भाषेंतच पण रोमन लिपी-मध्यें हातांनीं लिहिलेलें असें व सुभेदार मेजर साहेबांचें त्या भाषणाला उत्तर उर्दू लिपीमध्यें.

अखेर तो दिवस उजाडला. दिवसभर सगळ्यांचे निरोप घेऊन सुभेदार मेजर साहेब निघण्यापूर्वी समारंभाच्या स्थानी पोहोंचलें. आम्ही सर्व ऑफिसर्स-कर्नल साहेब सुद्धां आधींच तेथें हजर होतो.

चहा पिण्याचा समारंभ व्यवस्थित पार पडला. कर्नलसाहेब परिस्थिती ओळखून भाषण करण्यास उभे राहिले. लागलीच जमादार हेडक्लार्क साहेबांनी एक चुस्त सलाम ठोकून, कर्नलसाहेबांच्या भाषणाचा कागद, नम्रतेनें साहेबांजवळ दिला. कर्नल साहेबांनी चाळीशी लावून एक ओझरती नजर फिरवली आणि सुभेदार मेजर साहेबांचेकडे पाहून वाचावयास सुरुवात केली.

'सुभेदार मेजर मौला बख्श साहेब, आफिसर साहेबान और दीगद व्ही. सी. ओ. साहेबान.

आज हम लोग हमारे पुराने सुभेदार मेजर साहेब ओ के आज हमारेसे रुकसत ले रहे है, उनको खुदा हाफिझ् करनेके वास्ते एकठे हो गये है.

हमारे सुभेदार मेजर साहेबने काफी—काफी—काफी—पुढें कर्नल साहेबांना अक्षर लागेना म्हणून त्यांनीं न लागणारे दोनचार शब्द खाऊन टाकिले व भाषण पुढें चालू ठेविले.

दोन मिनिटांनी पुन्हा तोच प्रसंग उद्भवला. पुन्हा कर्नलसाहेबांनी कांहीं शब्द खाल्ले व नेटानें भाषण वाचणें सुरूं ठेविलें.

पुन्हां दोन-तीन मिनिटांनीं कर्नल साहेब अडखळले. सगळीकडे स्मशानशांतता पसरली. जमादार हेडक्लार्क साहेबांचा चेहरा पार उतरून गेला. कर्नल साहेबांनी पुन्हां दोन-चार शब्द खाल्ले तरी काही जमेना. आतां मात्र त्यांचा पारा वर चढूं लागला.

आणखी एका प्रयत्नानंतर मात्र कर्नल साहेब खरोखरच कावले. त्यांनी कागद उघडून पाहिला. अजून बरेंच भाषण वाचावयाचें राहिलें होतें. ते एकदम उसळून जमादार हेडक्लार्क साहेबांचेवर गरजले, "जमादार इनायतुल्ला• मुझे मालुम नहीं ठा, के टुम् अभटक अंग्रेझी भी नैंही लिख सक्ता हाय्. किस गढने टुमको जमादार बनाया? (त्याचें प्रमोशन ह्याच कर्नल साहेबांनीं केलें होतें.)

हम एक लफ्ज भी नहीं पढ सक्टा है."

नंतर हातांतील कागद जमादार हेड-क्लार्कच्या तोंडावर फेकीत उद्गारले, 'लो, अभि टुम् ही पढो—हम् बैठ जायेंगे.'

## स्वयंच लिखितं स्वयं न वाचयति

आतां माझ्या एका परमप्रिय मित्राची, त्यानें स्वतः सांगितलेली गोष्ट ऐका.

माझे मित्र १९४४ अथवा १९४५ साली नवीनच बढती मिळून लेफ्टनंट कर्नल झाले होते व त्यांची नेमणूक वझिरिस्थानमध्यें एका शीख पलटणीवर झाली होती. त्या छावणीमध्यें हे एकटेच हिंदुस्थानी कमांडिंग ऑफिसर होते. त्यांचे व इंग्रजाचे जन्मजात हाडवैर. त्यांच्या पलटणीमध्यें त्यावेळेस इंग्रज आणि हिंदुस्थानी असे दोन्ही ऑफिसर्स होते.

चार्ज घेतल्याबरोबर कर्नल साहेबांनीं पलट-णीच्या ४–५ इंग्रज ऑफिसर्सना आपल्या ऑफिसमध्यें बोलावून खूप झाडले. ते म्हणाले, 'तुमच्या देशबांधवांचे हाताखाली मी फार कष्टांत दिवस काढलेले आहेत. तरी पण मी त्याचा वचपा तुमच्यावरती काढूं इच्छित नाहीं. जेथपर्यंत तुमचें काम ठीक आहे तेथपर्यंत माझें कांहीं म्हणणें नाहीं. पण लक्षात ठेवा कीं जर कामचुकारपणा केलात तर माझ्याशीं गाठ आहे. मग माझ्याइतका वाईट मनुष्य ह्या पृथ्वी-वर शोधून सापडायचा नाहीं. सहाजिकच इंग्रज

अनुक्रमणिका

ऑफिसर्सचें धाबे दणाणलें व ते कर्नल साहेबांना कर्दनकाळ समजूं लागले.

एके दिवशीं सकाळीं ९ चे सुमारास कर्नल साहेबांनी एका इंग्रज ऑफिसरला आपल्या ऑफिसमध्यें बोलावणें पाठविलें. कर्नलसाहेबांनीं एकदम बोलाविणे पाठविलें म्हणून त्याच्या छातींत धडकीच बसली. तो घाबरतच त्याचे समोर आला. त्याच्या समोरच कर्नल साहेबांनीं एका कागदाच्या तुकड्यावर ५-६ ओळी खरडल्या आणि खेकसले, 'मी लिहिल्याप्रमाणें सर्व कामें मी येईपर्यंत झालीं पाहिजेत. समजलें का ?' त्यानें बिचाऱ्यानें कागदावरती एक ओझरती दृष्टि टाकली आणि 'जी हुकूम' म्हणून तो ऑफीसबाहेर सटकला. नंतर लागलीच कर्नल साहेब बाहेर पडले.

बिचारा इंग्रज ऑफीसर घाम पुशीत आपल्या ऑफीसमध्यें बसला आणि कागद उलगडून कर्नल साहेबांना काय काय कामें दिलीं आहेत तें पाहूं लागला. पण कर्नल साहेबांचें हस्ताक्षर इतकें चांगलें (!) होतें कीं त्याला अक्षर उलगडा कांहीं होईना. त्यानें व त्याच्या हवालदार क्लार्कनी पुष्कळ प्रयत्न केला तरी कोडें कांहीं सुटेना.

अखेर तो व दुसरा इंग्रज ऑफीसर मिळून दोघेजण जमादार हेड क्लार्क साहेबांचेकडे गेले. कर्नल साहेबांच्या लिखाणाची त्यांना संवय असावी व त्यांचेकडून ह्या गुढाचा उलगडा होईल अशी त्यांना आशा होती. पण हेडक्लार्कनीही हात टेकले. अखेर सर्वांनुमतें असें ठरलें कीं अक्षर उलगडा खुद्द कर्नल-साहेबच करूं शकतील, आणखी कोणालाही तें जमणें शक्य नाहीं. पण !

मांजराच्या गळ्यांत घंटा कोणी बांधावयाची हा फारच मोठा प्रश्न उपस्थित झाला. स्वतः होऊन कर्नलसाहेबांचें समोर उभे राहाण्यास कोणीही वीर स्वखुषीनें तयार होईना. अखेर ज्या ऑफिसरला तो लेखी कागद दिला होता त्याच दुर्दैवी प्राण्यावर हें संकट लादण्यांत आलें.

कर्नल साहेब २–२॥ तासांनीं परत आले. त्यांच्या बोलावण्याची वधस्तंभाकडे नेण्यांत येणाऱ्या अपराधाइतक्याच आतुरतेनें, तो दुर्दैवी ऑफिसर वाट पहात होता. वीस–पंचवीस मिनिटें होऊन गेलीं तरी बोलावणें नाहीं असें पाहून त्यानें एक सुटकेचा उसासा टाकला. तरी पण खरी लढाई पुढेंच होती. कर्नल साहेबांना दिसणार नाहीं अशा बेतानें त्यानें त्याचे ऑफिसचे बाजूने दोन तीन चकरा मारल्या. कर्नल साहेबांचे टेलिफोनवरून त्यांचें बोलण्याचा आणि तसेच त्यांच्या जगप्रसिध्द तीन मजली हंसण्याचा आवाज त्यानें ऐकला. साहेबांचा 'मूड' जरा चांगला दिसत आहे असा अंदाज केला. तेवढेंच दुःखांत सुख.

अखेरीस मनाचा हिय्या करून व ते कागदाचे चिटोरे हातांत घेऊन, तो कर्नल साहेबांना दिसेल अशा बेतानें त्यांच्या ऑफिस-समोर उभा राहिला. कर्नल साहेबांचे टेलिफोन-वरील संभाषण संपलें. त्यांनीं वर पाहिलें आणि ह्या ऑफिसरला वाटलें जर आतां धरणी पोटांत घेईल तर बरें.

कर्नल साहेब त्यांतल्यात्यांत सौम्य स्वरांत म्हणाले, 'हं ! जॅकसन ! काय आहे रे.'

कॅप्टन जॅकसन गर्भगळित होऊन कर्नल साहेबांसमोर उभा राहिला व एक मस्तपैकीं सलाम ठोकून चांचरत म्हणाला, 'साहेब, मघाशी तुम्ही हा कागद मला लिहून दिला होता.'

कर्नल साहेब 'हं. मग पुढें काय.'

जॅकसन–'साहेब माफ करा, पण आम्हांला काय लिहिलें आहे ह्याचा मुळींच उलगडा झाला नाहीं. सर देवाशपथ आम्ही सर्वांनी खूप खूप प्रयत्न केला पण, सर कांही जमत नाहीं.

कर्नल साहेब–'आण पाहूं कोठें आहे तो कागद ?'

कॅप्टन जॅकसनने ते चिठोरें कर्नल साहेबांना दिलें. त्यांनीं तें निट निरखून पाहिलें. कांहीतरी लिहिलें होतें खरें. मग एकदा उभे मग आडवे, नंतर उलट व त्यानंतर सुलट अशी त्या चिठोऱ्याची सर्व तऱ्हेनी तपासणी झाली. अक्षरही त्यांच्या सारखेंच गिचमीड होतें.

कर्नल साहेबांनीं २ मिनिटें विचार करून पाहिला पण २–२॥ तासाआधीं डोक्यांत काय चाललें होतें याची कांहीं त्यांना कल्पना येईना. अखेरीस ते उद्गारले 'हं मग जॅकसन ! काय म्हणणें आहे तुझें.'

जॅकसनः 'कांही नाहीं सर. तेवढें लिहिलेलें जरा वाचून दाखवाल तर कृपा होईल.

कर्नल साहेबः 'हँ–हँ–हँ अरे मूर्ख पोरा, मी लिहिलेलें मला स्वतः वाचता आलें असतें तर मी एव्हाना जनरल नसतो का झालो ! मला काय माहीत मी काय लिहिलें आहे तें. 'आणि आतां मी तें विसरूनही गेलों. जा. पळ आता. आणि पुन्हां अशी चूक करूं नकोस. मी काय लिहिलें हें मला तेव्हांच विचारलं पाहिजे, समजलं.

## घोडदळाची इभ्रत

जुन्या घोडदळांतील ऑफीसर्स, त्यांचा चढेल-खोरपणा, अहंमन्यता आणि शेखीबद्दल प्रसिद्ध असत. मग त्यांचे कर्नलसाहेब म्हणजे अगदीं असली अर्क.

ब्रिटिश अमदानींतील गोष्ट. हिंदी घोडदळांचे दोन रिसाले (पलटणी) एकाच छावणींत एकमेकाशेजारच्या बराकीत होते, पण बाहेर पडल्यानंतर पक्क्या रस्त्याला मिळणारा मार्ग एकच होता.

जनरल साहेबांच्या वार्षिक चांचणीची वेळ आली. दोन दिवस दोन्ही रिसाल्यात एकच धामधूम सुरू होती. साफसफाई नेटानें व जोरानें चालू होती. दोन्ही कर्नल साहेबांनीं आपापल्या घोडदळांना बजावून ठेवलें होतें कीं शेजारच्या रिसाल्यापेक्षां आपला नंबर वर लागला पाहिजे. मग काय विचारतां, दोन्ही घोडदळांच्या बराकी, घोड्यांच्या पागा, खोगिर, लगाम व इतर सामान सर्व कांहीं आरशासारखें स्वच्छ व चकचकत होतें.

जनरल साहेबांची येण्याची वेळ सकाळीं ८ वाजतां ठरली होती, पण ते पहिल्या प्रथम कोणत्या रिसाल्यात जाणार हें आधीं जाहीर झालें नव्हतें. कारण तोही एक चढाओढीचा विजय झाला असता. असो.

सकाळीं ७ वाजून ४५ मिनिटांनी दोन्ही कर्नलसाहेब आपापल्या घोडदळांची पहाणी करून व साफसफाई मनपसंद झाली आहे अशी खात्री करून आपापल्या रिसाल्यांच्या प्रवेश द्वाराजवळ हजर झाले. सर्व कांहीं अगदीं दृष्ट लागण्यासारखें होतें.

दोघांनीही पुन्हां एकदां आपापल्या रिसाल्यांचे कडे अभिमानानें दृष्टि फेंकिली आणि कर्मधर्मसंयोगानें दोन्ही कर्नल साहेबांनीं एकाच वेळेस मुख्य रस्त्याकडे पाहिलें आणि हायरे दैवा ! मुख्य रस्त्याला जोडणाऱ्या त्यांच्या समाईक रस्त्यावर एक मोठा घोड्याच्या लिदेचा पोह.

पहिल्याप्रथम दोघांनीही तिकडे न पाहिल्या-सारखें केले व आपलीं तोंडें फिरविली- पण मनापासून दोघांनाही चैन पडत नव्हतें. इतके रक्त आटवून व साफसफाई करून जनरल साहेबांनी दर्शनीच जर लिदेचा ढीग पाहिला







अनुक्रमणिका

तर 'प्रथमग्रासे मक्षिकापतः' व्हावयाचे. बरे ते शेजारच्या रिसाल्यात गेले तर उत्तमच झाले. पण समजा लहर फिरून आधी माझ्या-कडे वळले तर! मग आली का पंचाईत. पुन्हां लीद रस्त्याच्या मधोमध असल्यामुळें ती माझ्या रिसाल्यांतल्या घोड्यांची नाहींच नाही असें छातीठोकपणें सांगणें एकालाही शक्य नव्हतें.

अखेर एका कर्नलला अगदीं राहवेना. तो स्वतः शहानिशा करून घेण्यासाठी आपल्या रिसालदार मेजर (सुभेदार मेजर) ला बरोबर घेऊन त्या लिदेच्या पोहापाशी गेला व म्हणाला, 'क्यौं रिसालदार मेजर साहेब यह लिद कभी हमारे घोडेकीं हो सकती है ?'

रिसालदार मेजर साहेबांनीं आणखी जरा जवळ जाऊन नीट निरीक्षण केलें व लिदेचा वास घेऊन उत्तर दिलें.

'नही हुजूर; यह हमारे रिसालेके घोडोंकी कैसी हो सकती है ? जनाब, हमारे वहा इतना दुबला घोडा हैही नही. देखिये हुजूर यह लिद कितनी पतली है और बदबू भी कितनी है. और देखिये हुजूर इसका रंग भी कैसा काला है. हमारे घोडोंकी लीद तो समजीये जैसे सोना. इस घोडोंको जरूर जरूर बदहझमी है. हमारा तो एकभी घोडा बीमार नहीं हुजूर.'

कर्नल साहेबांना खात्री होतीच पण त्याशिवाय रिसालदार मेजर साहेबांचा दुजोरा मिळाल्यावर ते शांत चित्तानें व विजयी मुद्रेनें पुन्हां आपल्या प्रवेशद्वाराजवळ येऊन उभे राहिले.

दुसरे कर्नल साहेब होते त्यांचें नांव होतें मॉरिस. त्यांच्याच्यानें तरी कोठें रहावत होतें. पहिले कर्नल साहेब फर्ग्युसन यांची विजयी मुद्रा मॉरिस यांनी पाहिली व जेमतेम फर्ग्युसन साहेब प्रवेशद्वाराजवळ पोहोचेपर्यंत त्यांनी धीर धरला व नंतर ते स्वतः त्यांच्या रिसालदार मेजरला घेऊन लीद पहाण्यास पोहोचले. त्यांच्या रिसालदार मेजरनीही त्यांना पहिल्या रिसालदार मेजर सारखेच उत्तर दिलें असावें. कारण तेही विजयाच्या आनंदांत परतले.

तरी पण लीद तेथेंच होती व पेचप्रसंग (लीद तेथून कोणत्या तरी रिसाल्याच्या झाडू-वाल्यांनी उचलावयाची) अद्याप सुटला नव्हता. जनरल साहेबांची मोटर येण्यास फक्त पांचच मिनिटें राहिली होती. आतां प्रश्न फक्त दोन प्रतिस्पर्धी घोडदळांचा नसून हिंदुस्थानी सेनेच्या घोडदळाची इभ्रत आतां पणास लागली होती.

आणखी एक मिनिट गेलें. दोन्ही कर्नल साहेबांनी एकाएकी कांहीं तरी निश्चय करून ते एकमेकांकडे वळले. फर्ग्युसन म्हणाला, 'हे पहा मॉरिस!' उत्तराऐवजी मॉरीस नुसता हंसला व म्हणाला, 'ठीक है!'

क्षणार्धांत दोन्ही रिसाल्यांच्या दोन दोन झाडूवाल्यांनी विजेच्या चपळाईनें येऊन लीद उचलली आणि हिंदी घोडदळाची इभ्रत राखली.

● ● ●

*(या सर्व सत्यकथा असल्यानें अर्थातच मूळचीं नांवें बदलून काल्पनिक नांवें दिलेलीं आहेत. स्थळाचा निर्देश मात्र सत्य आहे.)*

रिटा नेहमीपेक्षां लवकर उठून आपल्या कामाला लागली तरी कर्नल अजून परतले नव्हते. अगदीं साखरझोपेंत असतांनाच कर्नलना ऑफिसमधून बोलावणं आलं होतं. ते उठून आपला ड्रेस करतात न करतात तों त्यांना त्वरा करण्याबद्दल फोन आला होता अन् मग कर्नल घाईघाईनें जीपमधून निघून गेले होते. यानंतर रिटा बराच वेळ जागी होती. या कुशीवरून त्या कुशीवर ती बराच वेळ तळमळली अन् मग तिनं उशीकडचा दिवा लावून पुस्तक वाचायला घेतलं. वाचतां वाचतां कधीं झोंप लागली तें तिचं तिलाच कळलं नव्हतं.

दिल्लीला आल्यापासून कर्नलांना असंच मधूनमधून बोलावणं येई अन् रिटाला त्यांत कांहीं वाटतहि नसे. कारण तिनं समजून उमजून, खांद्यावर जरी त्यांनीं थोपटल्यासारखं केलं तरी त्यांत रोजची ओढ नाहीं याची तिला जाणीव झाली. त्यांचा आजचा नूर कांहीं वेगळाच होता. अशा प्रसंगी पतीच्या खाजगी गोष्टींशीं आपला कांहीं संबंधच नाहीं असं भासविण्याऱ्या चतुर स्त्रियांत रिटाची गणना होत होती. आणि म्हणूनच आज पंधरा वर्षें या कडव्या अन् करारी कर्नलांवर ती एकछत्री सत्ता गाजवीत होती.

रिटानं चहा-नास्त्याची वर्दी दिली व ती नेहमींच्या जागीं, व्हरांड्यावरील टेबलापाशीं बसून त्यांच्याशी नेहमीप्रमाणेंच प्रेमालाप करूं लागली. पण कर्नलांचं मन त्यांत रमत नव्हतं. त्यांना मनःस्ताप असह्य झाला होता. त्याचा स्फोट झाल्याखेरीज त्यांना बरं वाटलं नसतं. आपल्या मनावरील




"फायर !" कर्नलांनी ऑर्डर सोडली. कॅप्टन काणे अगतिकपणे उभे राहिले. खिशांतून पिस्तूल काढून भोसल्यांनी त्या धोकेबाज काळजाच्या चिंधड्या उडविल्या..........

वेळप्रसंग पडल्यास प्राणार्पण करण्यास जराहि न कचरणाऱ्या अशा या भारतीय मिलिटरी ऑफिसरशीं विवाह केला होता. ही नोकरी म्हणजे सुळावरची पोळी याची तिला पूर्ण जाणीव होती व कोणत्याहि प्रसंगाला तोंड देण्याइतकी तिच्या मनाची तयारी तिनं वरमाला कर्नलांच्या गळ्यांत घालतांनाच केली होती. हे सारे विचार तिच्या मनांत चालू असतांनाच बाहेर जीपचा आवाज आला व तिच्या लाडक्या अल्शेशननं-टॉमनं-तिला कर्नल बाहेर आल्याची जाणीव करून दिली. रिटा हंसत हंसत त्यांना सामोरी आली.

टॉमनं सलामी दिल्यावर हातांत जें असेल तें बाजूला सारून त्यांना सामोरे जायची आज पंधरा वर्षें नकळत तिच्या पायांना संवयच झाली होती. तिला पाहतांच कर्नल हंसले व तिला दाबाचा स्फोट करून ते गंभीर स्वरांत बोलले, ' रिटा ! पहांटे चिन्यांनीं आपल्यावर अचानक हल्ला केला, म्हणून मला मघां बोलावणं आलं होतं.' कर्नलाचें हे शद्ब ऐकतांच रिटा क्षणभर सुन्न झाली. तिला वाटलं साऱ्या घरभर फलक लावलेत, ' हिंदी चिनी भाई भाई !!' अन् हेंच शब्द कोणीतरी मोठ्यानं ओरडून आपल्या मस्तकावर घणाचे घाव घालत आहे. तिनं चेहरा शांत ठेवण्याचा निष्फळ प्रयत्न केला. कर्नलांच्या तें ध्यानांत आलं पण ते बोलले, ' यांच्यापेक्षांहि फसवा अन् भयकर शत्रू जरी आला तरी त्यांना हुसकून स्वातंत्र्य अबाधित राखण्याकरतां अखेरपर्यंत लढत द्यायची हा भारतियांचा पूर्वापार चालत आलेला तेजस्वी बाणा आहे. हेंच गरम रक्त माझ्यांतून वहात आहे आणि तूं माझी अर्धांगी आहेस.' रिटानं त्यांना स्मित करून जणूं

होकारच दिला. "शंभर वर्षांपूर्वी स्वातंत्र्याकरतां प्राणपणानें लढून धारातीर्थी पडणारी वीरांगना लक्ष्मीबाई, आपलं प्रतिक मागं ठेवून गेली आहे..."

"त्याची आम्ही जाणीव ठेवावी असंच ना?" रिटा गंभीरपणें बोलली. इतक्यांत बटलर नाश्ता घेऊन आल्यामुळें विषयाला मध्येंच खंड पडला. रिटा हंसत हंसत चहा तयार करूं लागली.

रिटाच्या अंतर्यामी मात्र बरीच खळबळ माजली होती. ती जन्मानं चिनी होती! नकळत लग्नापूर्वीचं चित्र तिच्या डोळ्यांपुढून सरकूं लागलं. तिला स्वतःचं बालपण आठवलं. यांगत्से नदीचं स्मरण झालं. रिटा पूर्वस्मृतींत तल्लीन झाली. तिला वाटलं आजी आपल्याला कुशींत घेऊन गोष्टी सांगत आहे, आई मागावर कापड विणत आहे अन् बाबा मोठ्या भावाला घेऊन शेतावर चालले आहेत. "लान चि, तुला माहीत आहे, हे मिलिटरीचे लोक कडवे असले तरी लहान मुलांकडे किती प्रेमानें पाहतात! आम्हां चिन्यांना नेहमींच स्वाऱ्यांना तोंड द्यावं लागतं. असाच एकदां हल्ला आला होता न् पहाडांत आम्हीं आसऱ्याला धांवलों. मला आई होती. तिनं दोन सफेद कोंबड्या व एक काळा डुक्कर मला खेळायला आणून दिला होता. पहाडावर या तिघां मित्रांना मी नेण्याचा खूप प्रयत्न केला. पण तिघंहि हाताला आले नाहींत. महिन्यानं परत येतो तर तिथेहि व्यवस्थित! भांड्यांत अंडी न् सोबत अंड्यांची तारीखवार नोंद केलेलं यंत्र." कर्नलांची रेडिओ सुरूं करण्याबद्दलची हांक ऐकून ती दचकून भानावर आली. "रिटा! तुझं काय चाललं होतं? किती मी हांका मारल्या!" उत्तर देण्याचं कटाक्षानं टाळून तिनं रेडिओ चालू केला. रेडियोंतून बातम्या ऐकूं येत होत्या. चिन्यांनीं आगेकूच केली असून नेफा व लडाखमधील बरींच ठाणीं हस्तगत केलीं आहेत!' कर्नलांनीं दाढी अर्ध्यावरच सोडून त्वेषानें मूठ टेबलावर आपटली. "पंचशील यांनीं धुळीस मिळवलं!"

रिटा कामं आवरूं लागलीं. तिच्या डोळ्यांसमोरून मघांचा तुटलेला दुवा परत सांधला जाऊं लागला. तिची आई चिंग लान व वडील

**सौ. सुमन वागळे**

वँग शु हु तिच्यां कानांत कनफ्युशिअसच्या गोष्टी मोठ्या अभिमानानें सांगतांहेतसं तिला वाटलं. वेळप्रसंगीं सारासार विचार करून विवेकानं वागायला सांगणाऱ्या त्या तत्त्ववेत्त्यांचा उपदेश तिचे आईवडील करीत असल्याचा तिला भास झाला!

चिंग लान सौंदर्यखनि असून फ्ल्युट वाजविण्यांत निष्णात होती. तिनं विणलेलं कापड तिच्या चेहऱ्यासारखंच सुबक अन् हंसरं असे अशी तिची कीर्ति ऐकून वँगच्या वडिलांनी तिला मागणी घालून सून म्हणून घरांत आणली होती. तोंच सौंदर्याचा वारसा रिटाला मिळालेला होता. तिचे वडील भल्या पहांटे बू फँगला घेऊन शेतावर जात. दगडी भिंतींनी वेढलेल्या. खेड्यांत त्यांची शेती होती. मधलं तळं ओलांडून त्यांना पुढं जावं लागे. या तळ्यांत डुंबणारीं बदकं न् हंस छोट्या ला चिनला मोह घालीत. डुकरं व म्हशी चिखलांत लोळतांना पाहून तिला मोठी मौज वाटे. म्हणून ती हट्टानें त्यांच्याबरोबर मधूनमधून जाई. येथें खेड्यांत त्यांचें घर दोन खोल्याचंच होतं. ला चिनला शहरांतील वाड्यांपेक्षां हेंच घर अधिक पसंत पडे. दुपारीं मिळणारा गरम भात व भाजी तिला अमृतमय लागे. आईनं बनविलेल्या मांस, मासे यांची तिला आठवण पण होत नसे. काठ्यांनीं भात खाण्याची फँगची अन् तिची पैज लागे. यांत फँग जाणूनबुजून हरे! तिला वाटायचं आपणंच त्याला हरवलं! अशीं तीं एकूण नऊ भावंडें होतीं व प्रत्येकाच्या जन्माच्यावेळीं आजी दारांत ओल्या आल्याचे तुकडे टांगी. हें आलं मुलांच्या संख्येवर कोणाची नजर पडूं देत नाहीं असा जुन्या चिन्यांप्रमाणें आजीचा समज होता!

"रिऽऽटा! मी जरा जाऊन येतों ग,' या कर्नलांच्या शब्दांनीं ती आतां तिसऱ्यांदा भानावर येत होती. कर्नल भोंसल्याप्रमाणें आज तिचंहि मन थाऱ्यावर नव्हतें. कर्नल गेल्यावर तर तिला एकदम् सुनं सुनं वाटूं लागलं. रेडिओ, विणकाम फार काय तिच्या लायब्ररींतल्या आवडत्या ग्रंथांतहि तिचं मन रमेना. म्हणून ती शयन मंदिरांत आली अन् तिनें आपला देह हलकेच कॉटवर लोटून दिला! अशी निपचित ती किती वेळ पडून होती कोण जाणे! तिला जाग आली ती परत टॉमच्या गडबडीमुळें. मग ती चटकन् उठली व कर्नलांना सामोरी गेली. तिनें आज मनाशीं कोणती तरी पक्की खूणगांठ बांधली.

कर्नल आले ते जरा सुश्शांतच. ज़रा कुठें गोष्टी होतात तों जेवणाची वेळ झाली. जेवतांना ते गुप्पगुप्पच होते. त्यांचा आवडता पुलाव असूनसुद्धां आज त्यांनीं बटलरला शाबासकी दिली नाहीं अन् रोजच्याप्रमाणें हाकहि मारली नाहीं त्याबर. तेव्हां रिटाप्रमाणें तोहि जरा हिरमुसलाच झाला. त्यानं बरोबर ताडलं कीं, आज साहेबांचं मन ताळ्यावर दिसत नाहीं. रिटानं आग्रह करतांच उत्तर देण्याऐवजीं ते बोलले, "खरंच रिटा, मला या चिन्यांचं नवल वाटतं अन् त्यांच्या विश्वासघातकी स्वभावाची चीडहि येते. आम्ही त्यांना 'भाई, म्हणून कवटाळले पण ते कसाई निघाले!" टॉमच्या रोजच्याप्रमाणें चाललेल्या लुडबुडीला उत्तर देऊन त्याला कुरवाळण्यासुध्दां ते आज विसरले. 'नेपोलियन म्हणाला होता तेंच खरं. चीन जर जागृत झाला तर, तो जगाला धोका उत्पन्न करील!" "त्या वीर पुरुषाचे उद्गार खोटे होणारसं दिसतं." रहस्याचा भुरका मारतां मारतां रिटानं पुष्टी दिली. कर्नलांचा चेहरा न्याहाळून पहात ती पुढें म्हणाली, 'त्यांना वेळींच ठेचायला हवं होतं.' 'अग! पण ठेंचल्यावर भडका उडाला असता. म्हणून तर इंडोचायना, कोरिया, लाओस या प्रकरणीं आम्हीं युद्ध थांबविण्याचा जोरदार प्रयत्न केला, नाहींतर या 'भाईनी' आग्नेय आशियांत पाय पसरले असते!'

'रिटा! तुला असं वाटतं कां, कीं यांची राक्षसी महत्वाकांक्षा आमच्या लक्षांत आली नाहीं?' तिनं फक्त त्यांना न्याहाळून पाहिलं. कर्नलांना बोलल्याशिवाय राहवेनाच. ते पुढें बोलतच राहिले. 'त्या लोकांनीं नेलांगपासून चांच चेमो, पेगाँग वगैरे ठाणीं घेतलीं तरी आम्ही शांत राहिलों, कारण आमची आर्थिक व भौगोलिक परिस्थिति युद्धास विरुद्ध असून लढा देण्यास परकीय राष्ट्रांची मदत घ्यावी लागेल, अन् मग जागतिक युद्ध होईल, ही धास्ती होतीच,' इतकं बोलणं होईतों जेवण आटोपलं. तरी उठतां उठतां ते बोलले, 'म्हणून प्रत्येकवेळीं आम्हीं त्यांना कोंडींत पकडण्याचा प्रयत्न केला, त्यांना भाई मानले पण ते सापासारखे उलटलेच! निदान चाऊ एन लायनीं

पूर्ण विचार करायला हवा होता !' 'आतां हळहळत न बसतां आल्या प्रसंगाला निकरानं तोंड द्यावंच लागणार !,' रिटा हात पुसतां पुसतां म्हणाली.

असे तळमळींत त्यांचे दोन दिवस गेले. संध्याकाळीं बाहेरून आल्यावर कर्नल रिटाला जवळ बोलावून म्हणाले, 'आमचे जवान, जरी त्यांनीं परिस्थितीमुळें माघार घेतली तरी निकरानें लढत आहेत. नेफा, लडाख पडत आलें, चिल्मूलपर्यंत ते आले. अशा परिस्थितींत मला येथें रहावत नाहीं, मला अन्न गोड लागत नाहीं !'

'आपल्याला आघाडीवर जायला माझा पूर्ण पाठिंबा आहे. आपल्या खांद्याला खांदा लावून मी पण लढणार !' 'माझं रक्त चिनी असलं तरी गेल्या पंधरा वर्षांत आपल्या सहवासानं तें पूर्ण भारतीय बनलंय, कर्नल !' 'शाब्बास ! रितु.' कर्नल लाडांत आले म्हणजे तिला रितु या नांवानं संबोधित व तिच्या गालावर लाडिक चापटी मारत. आतांहि त्यांनीं तेंच केलं.

'मेजर देशपांडे, कॅप्टन भिसे व मी उद्यां आमचं पथक घेऊन निघणार हें नक्कीच.'

रिटानं कर्तव्यपूर्तीची संधि देणाऱ्या ईश्वराचे मनोमन शतशः आभार मानले. ती उद्यांच्या तयारीला लागली.

एकेक मनोराज्यें रंगवितां रंगवितां वेळ कसा गेला हें तिला कळलंच नाहीं. रात्रीं झोपेंतसुद्धां आपण वीरांगना होऊन लढतांना तिला दिसत होतं. क्षणांत तिला आपण झांशीची राणी बनून निर्धारानें लढतांना दिसे. तरवारीचा वार लागून आपण घायाळ होऊन पडलों आहोंत व कर्नल आपलं डोकं मांडीवर घेऊन आपल्याला शाबासकी देत आहेत, असं तिला वाटे. मध्येंच तिला आपण खंदकापलीकडून तोफांचा भडिमार करीत असल्याचं दिसे. विमानांत बसून बॉम्बिंग करतांना ती मोठ्या आवेशांत येई. 'फायर ! फायर !'' असे तिचे आवेशयुक्त शब्द ऐकून कर्नल खडबडून जागे झाले. रिटाचा आवेश पाहून ते स्वतःशीच हंसले. 'खरी माझी पत्नी शोभतेस' असें मनाशीं पुटपुटत त्यांनीं तिला जागें केलें. ती पूर्ण जागी झाल्यावर त्यांनीं तिला वस्तुस्थिति सांगितली. तें ऐकून लाजून तिची पुरेवाट झाली. पण झुंजुमुंजु होण्यापूर्वी त्यांना आगेकूच करायचें असल्यामुळें त्यांनीं हा विषय अर्धवटच सोडला व ती आपापल्या तयारीला लागली.

जीपमध्यें मेजर देशपांडे ड्रायव्हिंग करत होते. त्यांच्या बाजूला रिटा व कर्नल बसले होते. इतरांप्रमाणें रिटाहि मिलिटरी वेषांतच होती. जवानांचे थंडींत होणारे हाल ऐकून दयार्द्र अंतःकरणानें कर्नलांनी आपले बहुतेक वुलन सूट व जमतील तितके जर्सीज विकत घेतले होते. शांतपणें त्यांचा प्रवास चालला होता. 'मेजर !' भोंसल्यांनी शांततेचा भंग केला. 'सीमेवर त्यांचे व आपले लोक गस्त घालीत. चिनी आपल्या लोकांना सलामी देत 'हिंदी चिनी भाई भाई.' त्यांच्या पोटांत माओंनी ठासून भरलेलं, हल्ला चढविण्याचं विष, त्यांनीं जराहि दाखवून न देतां अचानक हल्ला केला. म्हणजे किती भयंकर वृत्ति !'

'मुसोलिनीपेक्षां माओच भयंकर म्हटला पाहिजे !' रिटानें मल्लीनाथी केली.

यावर मेजर आवेशानें म्हणाले, 'पहिल्यांदा हल्ला केला तेव्हां जवानांना वाटलं ते सलामीच देताहेत म्हणून ते स्वस्थच राहिले. पण तोफा आग ओकूं लागल्या तेव्हां त्यांना विचार करायलासुद्धां अवसर मिळाला नाहीं.'

'हल्ला झाला तेव्हां ९ हजार फूट उंचीवर होते जवान. २० ऑक्टोबरला पहाटेलाच त्यांना दुर्बुद्धि सुचली. तोंडानें 'चिनी हिंदी भाई भाई' म्हणत प्रेमाचें विडंबन सुरू केलं त्यांनीं,' रिटा दुःखानें उत्तरली.

यांच्याकडे कमी संख्या व शस्त्रास्त्रांचा अभाव तर त्यांनीं मॉटर, ९ एम्. एम्. गन, ऑटोमिक गन्स यांनींच हल्ला सुरु केला म्हणे ! तरी जवानांनीं प्रसंगानें गांगरून न जातां सिग्नलिंगचा नाश केला प्रथम व २० मैलांची दौड करून तवांग गांठलं' मेजरांनी पुस्ती जोडली.

'डोंगर कपारींतून अन्नाविणा तवांगांत पोंचले. जरासं अन्न मिळतांच लगेच त्यांनीं चिन्यांच्या हल्ल्यास प्रतिसाद देण्यास सुरवात केली,' मागें बसलेले कॅप्टन अभिमानानें सांगते झाले.

'मला तर या जवानांना प्रथम भेटून केव्हां एकदां आलिंगन देतो असं झालंय,' कर्नल उत्स्फूर्त होऊन म्हणाले. 'चिन्यांना पहिल्यापासून कोणाच्या ना कोणाच्या स्वारीला तोंड द्यायची संवयच पडून गेली आहे. म्हणून त्यांना तें जमून जातं,' रिटानें उदाहरण दिलें.

'माघार घ्यायची म्हटली तरी रस्ता शोधावा लागतो जवानांना,' कर्नल हळहळले, 'शिवाय त्यांना पठारावरून लढा द्यायचा असतो.'

'तरी जवान सर्व गोष्टींना धैर्यानें व शौर्यानें तोंड देत आहेत,' कॅप्टन बोलले. जवानांचं नांव ऐकलं म्हणजे त्यांचा ऊर अभिमानानें भरून येई.

अशा स्वबांधवांच्या शौर्याच्या गोष्टी करीत, क्वचित विश्रांती घेत पथक इच्छित स्थळीं पोंचलं सुद्धां. छावण्यांची बांधाबांध सुरू झाली. हवा एकदम गार होती. रिटा कर्नलकरितां वेगळी छावणी होती. 'रिटा ! तूं या मर्दानी पोषाखांत मोठी रुबाबदार दिसतेस बुवा !' कर्नलांनीं तिचं कौतुक केलं.

पोंचल्यानंतर थोड्यावेळांत जनरल मराठ्यांचा कॉल आला. या वेळीं तांतडीनं निघून आल्याबद्दल त्यांनीं कर्नलांचं अभिनंदन केलं व पुढें निराशेनें ते म्हणाले, 'कर्नल ! आज नेफा विभागांत आपली सेना मागें हटली. चिन्यांच्या रणगाड्यांपुढें जवान टिकाव धरूं शकले नाहींत. जनरल ली स्वतः आघाडीवर असून तिबेटचे सेनानी त्यांच्या जोडीला आहेत.' कर्नल क्षणभर खिन्न झाले पण आपण बटॅलियन घेऊन लवकर आघाडीवर जाणार असल्याची बातमी त्यांना दिली. मात्र तत्पूर्वी त्यांनीं नेफा आघाडीची पूर्ण पहाणी करावी, अशी सूचना देण्यास जनरल विसरले नाहींत. ऑर्डर्ली नकाशे घेऊन हजर होताच.

रिटा तर केव्हांच छावणीबाहेर पडून जखमी वीरांना भेटण्यास गेली होती. आपल्या मातृभूमी व बांधवांकरतां हंसत गोळ्या झेलणारे वीर तेथें होते. सर्वच अचानक गोंधळ उडाल्यामुळें तेथेंहि अनागोंदी कारभारच होता. यांच्या यातना कमी करण्याचा रिटानें निश्चय केला. स्त्रियांशिवाय नर्सिंग विशेष यशस्वी होत नाहीं, याची मात्र तिला रुखरुख लागली. ती मागें वळून पहाते तो कर्नल त्या वीरांचें अभिनंदन करण्यांत गढलेले तिनें पाहिले व स्त्रियांचे पथक सेवेकरतां निघालें असून प्रत्यक्ष लढत नसल्या तरी वीरांना उभें करण्यास त्या मोठ्या हिरीरीनें निघाल्याची गोड बातमी त्यांनीं तिला दिली. कर्तव्यदक्ष स्त्रियांबद्दल अभिमानानें ती क्षणभर रोमांचित झाली.

अनुक्रमणिका







प्रत्यक्ष आघाडीवरील परिस्थिति पाहून येथें निकारानें तोंड देणाऱ्या जवानांचे त्यांना मोठें कौतुक वाटलें. सैनिकांच्या मागें दोन्ही बाजूस हजारों मैलांचा डोंगराळ भाग तर चिनी सैनिकांना पठारांची सपाटी. ही दोन्ही बाजूंची खरी नैसर्गिक परिस्थिति होती. उत्तरेच्या अति थंड वाऱ्यापासून भारताचें रक्षण करणारा पितृवत् हिमालय येथें आपल्या अर्भकांना मृत्यूची खाई पसरून उभा होता!

कर्नल नेफाआघाडीवर गेल्यामुळें आजचा रागरंग वेगळा होता. चिन्यांच्या तोफांना तोंड द्यायला आज भारतमातेचा आणखीन् एक सुपुत्र निधड्या छातीनें व कावेबाजपणें लढत होता. रोज आगेकूच करणाऱ्या चिन्यांना आज कर्नलांनी ' जैसे थे ' केलें होतें. जांग विभागांत जवान पोलादी खांबाप्रमाणें उभे होते. तिबेटच्या पठाराच्या मागें आसरा असूनहि आज चिनी हतबल ठरले!

भोंसल्यांची खात्री होऊन चुकली. जगांतील दुसऱ्या कोणत्याहि राष्ट्राला नाहीं इतकी ही सरहद्द अवघड आहे. आज ही परिस्थिती ते प्रत्यक्ष अनुभवीत होते. एकेका सैनिकामागें अनेक हमाल, खेचरं, जीपगाड्या, ट्रक्स व मजूर यांचा तांडा लागे! हेलिकॉप्टर्स व मालवाहू विमानांची जरूर होती. चीनला सडका व परिस्थिति अनुकूल होती. जवळ अन्न व शस्त्रास्त्रें सांठविण्याची शक्यता होती. शिवाय सैनिकांची तर त्यांना जराहि कमतरता नव्हती.

दिवस जातां जातां कर्नल भोंसल्यांची खात्री झाली, येथें लढा देणेंच काय पण जगणेसुद्धां मुष्कील आहे. कपडा व शस्त्रास्त्रें यांची जवानांना वाण होती. परकियांकडून पुरवठा होणार तेव्हां पुढच्या गोष्टी. हवा इतकी गार होती कीं विस्तव पटवून अन्न शिजविणंच मुष्किलीचं होतं. तरीहि हे स्वदेशाभिमानी स्वातंत्र्यप्रेमी हंसत प्रत्यक्ष यमाशीं मुकाबला देत होते. लडाख भाग तर अत्यंत अवघड वाटला त्यांना. युध्द आघाडीपासून १०० मैल मागें रेल्वेमार्ग होता. श्रीनगर हा सर्वांत जवळचा म्हणजे १०० मैलांवरचा टप्पा! येथेंहि पुरवठा होई; तोहि चंदीगढहून विमानानें वा खुष्कीनें. लेह ते चुसुल जीप रस्ते जेमतेम होते. पश्चिमेला तर एकदम खबदाडी रस्ता असून मधूनमधून जीपच चालत नसे. चोवीस तास प्रचंड वादळी वारे चालू असत. यामुळें तर हालचाल करणंच अशक्य होई. प्रत्यक्ष एवढे लोखंडासारखे कर्नल, त्याचें अंगच बधीर होऊन गेलें होतें. यामुळें त्यांना एकदां मागें परतावं लागलं होतं! एकंदरींत कर्नल आल्यापासून आघाडीवर प्रगति होती.

स्त्रियांचं शुश्रुषापथक केव्हांच आलं होतं. स्वदेशाभिमानानें प्रेरित होऊन मोठमोठ्या हुद्देदारांच्या बायकांहि यांत सामील झाल्या होत्या. त्या थंडीवाऱ्यांपासून स्वतःचा व प्राणांतिक वेदनांपासून स्वबांधवांचा बचाव करीत होत्या. रिटा सर्वांवर तन्मयतेनें देखरेख करीत होती. गेले चारपांच दिवस कर्नल आघाडीवरून परतले नव्हते. त्यांची खुशाली तिला कळली असली तरी उगाचच तिच्यं काळजांत धडधडत होतं. पण ती जरासुद्धां कर्तव्यापासून विचलित झाली नव्हती. या अवधींत प्रत्यक्ष राष्ट्रपति येऊन प्रदेशाची पाहणी करून गेले होते. अशा परिस्थितींत लढणाऱ्या वीरांबद्दल त्यांनींहि धन्योद्गार काढले होते. कर्नलांच्या प्रशंसेवरून त्यांच्या गैरहजेरींत बटालियन पाठविण्याची जबाबदारी रिटावर आली होती. रिटा त्यांच्या बरोबरीनें विचार-विनिमयांत भाग घेत होती. ब्रिगेडियर प्रमुखांना सूचना देत होती. या तिच्या मुत्सद्देगिरीबद्दल खूष होऊन जनरलांनीं त्यांच्याबरोबर रहायला तिला खास परवानगी दिली होती.

भारतांतून शिजविलेल्या अन्नाची आणि कपड्यांची रास येत होती! मदतीकरिता कोट्यावधि रुपयांचा पाऊस पडत होता. परदेशांतून विमानें व शस्त्रास्त्रें यांची मदत येत होती. स्त्रिया अंगावरील दागिने उतरून मदतीदाखल देत होत्या. चोहों बाजूंनीं सहानुभूतीचा वर्षाव होत होता.

आज चारपांच दिवसांनीं भोसल्यांची भेट झाली. जखमी झाल्यामुळें ते चारपांच दिवस येऊं शकले नव्हते. रिटानें त्यांना इकडील सर्व बातमी दिली. कर्नल हवामान, दगदग व जखमा यांनीं खालावले होते. अपुरी शस्त्रें, अर्धपोटी अन्न असून त्यांनीं चिन्यांना आघाडी सर करूं दिली नव्हती. या गोष्टी रिटाला सांगतांना त्यांचा खालावलेला चेहरा उत्साहानें उजळून निघाला होता.

त्यांना पहातांच रिटाला १५ वर्षांपूर्वीचे चीनमधील कर्नल आठवले. त्यांच्या शेजारीं एक भारतीय कुटुंबें स्थायिक झालें होतें. त्यांच्याकडून रिटानें हिंदी भाषा व भारतीय रीतीरिवाज शिकून घेतले होते. कर्नल आपल्या बांधवाला भेटण्यास आले होते. कर्नल उघड्या जगांत अगदीं एकटे होते. उंच धिप्पाड देह व करारी चेहरा पाहून ती खूष झाली त्यांच्यावर. ओळख वाढत गेली. प्रथम जेव्हां तिच्या घरीं ते जेवायला आले तेव्हां भारतीय पदार्थ पाहून ते चकित झाले व तिची अस्खलित हिंदी बोली ऐकून पूर्ण गारद झाले होते. कांट्यांनीं भात खाण्याकरतां त्यांचा चाललेला अट्टाहास पाहून रिटा पोट धरधरून हंसली होती. पुढें त्यांच्या प्रेमाचं विवाहांत रूपांतर झालं होतं. लान चि आतां रिटा झाली होती. गेल्या पंधरा वर्षांत ती पूर्ण भारतीय बनली होती. दोघांचं नितांत प्रेम होतं एकमेकांवर. हा चित्रपट तिच्या डोळ्यांपुढून पुढें सरकत होता. अन् कर्नल सांगत होते, ' रिटा! आज जनरलांनीं जबरीनं विश्रांति घ्यायला पाठविलंय मला. मेजर देशपांड्यांच्या हातांत चार्ज देऊन आलोंय. '

आपलीं एकेक कामें आटपून ते सेटवर आले. जरासा वेळ बसून होतो न होतो तो त्यांना कॉल ऐकूं आला. कर्नलांना वाटलें, कॅप्टन किंवा जनरल कांहीं विजयाची वार्ता देत असतील, परंतु त्याना तो

...पान ५८ वर

---

पान १८ वरून

मिचिगन सरोवराच्या कांठी वसलेल्या शिकागो शहरांत पाश्चात्य संस्कृतीचें स्वरूप जणूं एकवटून दिसत होतें. यच्चयावत् पाश्चात्य देशांतील संस्कृतींतील उत्तमोत्तम तत्वांचा ज्याप्रमाणें अमेरिकेनें संग्रह केला आहे त्याचप्रमाणें त्या संस्कृतींतील कांहीं विघातक तत्वांचाही तिनें संग्रह केला आहे. अशा समाजापुढें स्वामी विवेकानंद भाषण करावयास उभे राहिले. समोरचा श्रोतृसमाज कोणत्या विचारांनीं भारला गेला होता? आपल्या धर्माहून उच्च धर्म नाहीं आणि आपल्या संस्कृतीहून उच्च संस्कृतीहि जगांत कोठें नाहीं; ही कल्पना त्या समाजास एका बाजूस ओढीत होती आणि दुसऱ्या बाजूनें हा तरुण संन्यासी काय सांगणार अशा कुतुहलानें समाज उत्सुक झाला होता—या अमेरिकन समाजापुढें स्वामीजींनीं

हिंदुधर्माचें अलौकिक तत्त्वज्ञान विशद केलें. भारतीय संस्कृतीचा झेंडा जगतांत फडकवून स्वामीजींनीं भ्रांत बनलेल्या पाश्चात्यांना स्वच्छ मार्गाचें दर्शन घडविलें. ' मयि सर्वमिदं प्रोक्तं सूत्रे मणिगणाइव ' हा श्रीकृष्णाचा संदेश त्यांनीं तिथें सांगितला. मनुष्य पापांतून पुण्याकडे प्रवास करीत नाहीं. दुःखांतून सुखाकडे जात नाहीं. अथवा असत्यांतून सत्यांत प्रवेश करीत नाहीं; तर कमी पुण्यांतून अधिक पुण्यांत; कमी सुखांतून अधिक सुखांत व अंधुक सत्यांतून पूर्ण प्रकाशमान सत्यांत प्रवेश करतो. चैतन्याचा अनुभव घेऊन तो स्वतः पूर्ण चैतन्यस्वरूप होतो. हा अभिनव संदेश स्वामींनीं त्यावेळीं सर्व जगाला दिला. त्यांच्या त्या छोट्याशा भाषणांतील विश्वात्मकता, मूलस्पर्शी आस्था व उदारता ही अननुभूत होती. निरनिराळ्या धर्मांचीं तत्त्वें विश्वव्यापक आहेत नि सर्व धर्मांचें ध्येय एकच आहे हें स्वामीजींनी केलेलें उद्घोषित केवळ अश्रुत अलौकिक व अभूतपूर्व होतें. आपला 'हिंदुत्व' हा प्रसिद्ध प्रबंध त्यांनी तिथें वाचला व वेदांताचे सार यासारख्या विषयावर चारदां बोलले. बौद्ध धर्मावरहि त्यांनीं व्याख्यानें दिलीं. आपल्या अमेरिकेच्या वास्तव्यांत त्यांनीं 'राजयोग' हा ग्रंथ लिहिला. त्यांच्या व्याख्यानांनीं अमेरिकन जनतेस वेड लावून सोडलें. अमेरिकेनंतर इंग्लंड युरोपचा दौरा त्यांनी केला व १८९७ च्या आरंभास ते प्रिन्स रिजंट लिओपोल्ड या जर्मन बोटीनें भारतांत परतले. लंडनमध्यें त्यांनी धर्माची आवश्यकता, जगत्धर्माचें स्वरूप व्यक्त आणि अव्यक्त पुरुष, माया आणि भ्रम, माया आणि साक्षात्कार, माया व मुक्ति इ. विषयांवर २४ व्याख्यानें दिलीं. तीच 'ज्ञानयोग' या इंग्रजी ग्रंथांत समाविष्ट आहेत.

भारतांत आल्यावर त्यांनीं कलकत्त्यास 'रामकृष्ण मिशन' ची स्थापना केली व उत्तर भारतांत संचार करून पुन्हां १८९९ च्या जुलैंत ते गोवळकोंडा बोटीनें दुसऱ्यांदा अमेरिकेस गेले व तेथून युरोप प्रवासानंतर ते १९०० च्या अखेरीस कलकत्त्याला आले व १९०१ ते १९०२ पर्यंत महासमाधिपर्यंत ते तिथेंच राहिले.

अमेरिकेस जाण्यापूर्वी १८९८ च्या सुरुवातीस त्यांनी गंगा नदीच्या तीरावर बेलूर येथें सुमारें १५ एकर जमीन विकत घेतली व तिथें एका प्रचंड आश्रमाची स्थापना केली. हा आश्रम आज 'बेलूर मठ' या नांवानें ओळखला जातो. आज रामकृष्ण मिशनच्या सर्व केंद्रांचें संचालन करणार केंद्रीय कार्यालय व मिशनचें आद्यपीठ म्हणून बेलूर मठ विश्वविख्यात आहे. हा मठ म्हणजे स्वामींची तपोभूमि आहे. हावडा स्टेशनापासून पाच मैलांवर असलेल्या या मठांत जाण्यासाठीं बसेसची सोय आहे व सकाळ-संध्याकाळ तो उघडा असतो. या मठाच्या आवारातच एका विशिष्ट जागेकडे बोट दाखवून आपले एक शिष्य स्वामी प्रेमानंद यांना त्यांनीं सांगितलें कीं, 'मी जेव्हां शरीर त्याग करीन त्यावेळीं पार्थिव अवशेषांचे दहन येथें करा.' आज त्याच जागीं त्यांची समाधि आहे.

स्वामीजी इच्छामरणी होते असें दिसतें. कारण 'चाळीस वर्षानंतर मी जगणार नाहीं' असें ते म्हणत व ते हयाच्या ३९ व्या वर्षीच समाधिस्थ झाले. त्या शुक्रवारीं म्हणजे ४ जुलै १९०२ रोजीं दुपारीं १ वाजता त्यांनीं आपल्या सर्व ब्रह्मचारी शिष्यांच्या खोलींत जाऊन संस्कृत व्याकरणाच्या तासाला येण्याची सूचना केली व तो व्याकरणाचा वर्ग तीन तास घेतला तरी विद्यार्थी कंटाळले नाहींत. त्यांनी वेदावर वक्तव्य करून योगानें तत्वज्ञानावर निरूपण केलें. त्या दिवशीं विश्रांतीचे वेळांत त्यांनीं देशाचा उत्कर्ष व अपकर्ष या संबंधांत सहकाऱ्यांशी चर्चा केली व ते उपासनेसाठीं म्हणून स्वतःच्या खोलींत गेले आणि रात्रौ ९ नंतर त्यांनीं महासमाधि लावली व ४० वर्षानंतर न जगण्याचें आपलें भविष्य खरें केलें.

स्वामीजींनीं जगभर आपल्या कार्याचा प्रसार केला. आज जगभर त्यांची शिष्यपरंपरा त्यांचें कार्य मोठ्या नेटानें पुढें चालवीत आहे. आणि महानिर्वाणाबरोबरच त्यांचें कार्य संपुष्टांत न येतां त्यांत अधिकाधिक तेज चढूं लागलें आहे. अमेरिका आणि विवेकानंद यांचा कांहीं विलक्षण संबंध आहे ! अमेरिकेचा स्वातंत्र्यदिन ४ जुलैला येतो व विवेकानंदाची पुण्यतिथीहि त्याच तारखेला येते. त्यांचे सद्गुरु भगवान् परमहंस यांची पुण्यतिथी भारताच्या स्वातंत्र्यदिनीं म्हणजे १५ ऑगस्टला येते हा एक विलक्षण योगायोग आहे. स्वामींच्या शिष्यांत मादाम मेरी लुई, हरलिऑन लॅंडसबर्ग, मिसेस ओलबुल, मिस् वाल्डा, ए. गुडविन, कॅ. सर्व्हिअर, प्रो. राईट, डॉ. स्ट्रिट, मॅक्स मुल्लर यासारखी थोर पाश्चात्य मंडळी होती. स्वामींच्या मठांत कु. मार्गारेट नोबल या महिलेनें स्वामींच्या हातून ब्रह्मचर्याची दीक्षा घेतली व आपलें उर्वरित आयुष्य त्यांच्या प्रचारकार्यासाठीं वेचलें. त्यांच्या त्या शिष्यभगिनीचें नांव आहे सिस्टर निवेदिता. भारतांतील एखाद्या मठांत पाश्चिमात्य स्त्रीला प्रवेश मिळाल्याचें सि. निवेदिता हें पहिलेंच उदाहरण होय.

स्वामी विवेकानंदांनीं रूढ धर्मावर कठोर हल्ला चढवून प्राचीन वैदिक धर्माचें उच्च तत्वज्ञान प्रसृत करण्याचें फार मोठें कार्य केलें. त्यांच्या ठायी शंकरार्याची बुद्धिमत्ता व चैतन्यांप्रमाणें हृदयाचा प्रेमळपणा होता. त्यांचा दृष्टिकोन फार व्यापक होता. देशाच्याच नव्हे तर अखिल मानवतेच्या उध्दाराची त्यांना तळमळ होती व त्याकरितां ते आमरण अत्यंत निःस्वार्थीपणें झगडले. स्वतःच्या कार्याबद्दल त्यांना अत्यल्पसुध्दां गर्व नव्हता तरी त्याचें मूल्यमापन त्यांनीं केलें होतें. त्यांनी ४० वर्षांत केलेलें कार्य सुमारें १५०० वर्षे पुरेल इतकें आहे. ते मानवतेचे उपासक होते. पूर्वग्रह दूषित दृष्टि सोडून भारतास समजून घेण्यासाठीं परत या असें त्यांनीं आपल्या परदेशी शिष्यांना वारंवार सांगितलें होतें. विश्वांत रहाणाऱ्या प्रत्येकाला ते आपलाच मानीत. सर्वांबद्दल त्यांना सारखीच ममता वाटे. हा साधु, हा पापी असा भेदभाव नव्हता. जगांतील दुःखांनी ते व्यथित होत. निरनिराळ्या धर्मांच्या अनुयायांत स्नेहसंबंध वाढावेत म्हणून त्यांनी अपरंपार यत्न केले. आज विवेकानंदांच्या चरित्राचें प्रत्येकानें मनन करावें. त्यांच्या तत्वांचें आचरण करावें कारण अनेक विवेकानंद निर्माण झाले तर जगाचें भवितव्य उज्ज्वल आहे.

●●●






पान १६ वरून

तयारी केली होती. सारा महाल शृंगारला होता. धुपाचा वास दरवळत होता. भरजरीची लोड–तक्क्यांची बैठक सजली होती. रुजामाच्या गालीच्यानी जमीन आच्छादली होती. हंडी-झुंब-रांच्या प्रकाशांत बैठक उजळत होती. प्रत्येक बैठकीजवळ उंची मद्याच्या सुरया व पेले ठेवले होते. पानांचे विडे बांधलेली तबकें लक्ष वेधून घेत होतीं.

समशेर आपल्या सरदारासह बैठकीवर येऊन बसला. राजनर्तिकेचं नृत्य सुरू झालें. सुरयांतील मदिरा पेल्यांत पडूं लागली. समशेर अभयला म्हणाला,

'आम्हीं तुमच्यावर खुश आहों. तुम्हीं नसता तर एवढ्या सहजपणें हें जमलं नसत. आमच्या दरबारी आम्हीं तुम्हांला मोठी जागा देऊं.'

एका पाठोपाठ नृत्यें होत होतीं. समशेर अधीर बनत होता. त्यानें विचारलें, अभय, ही दिरंगाई कां ?'

'हुजूर, असल्या कामांत दिरंगाईच चांगली.'

'पण आमची बेचैनी वाढते ना !'

'मी जाऊन वर्दी देतो.'

अभय आंत गेला. शामकुवर आरक्त डोळ्यांनीं उभी होती. अभयला पहातांच ती म्हणाली, 'कुमार मी तयार आहे. शक्यतों लवकर ही विटंबना संपवा.'

'देवी, नृत्य संपतांच आपलं गाणं आहे.'

'समजल' म्हणून शामकुवर वळली. अभयनें हाक मारतांच तिनें विचारलें, "आण-खीन कांहीं आज्ञा आहे ?"

'हो', अभय म्हणाला. "गाणं होत असतां प्रवेशद्वाराच्या बाहेर दिसणाऱ्या एका शामदानी-कडे लक्ष ठेवा. ज्या क्षणीं ती विझेल त्याक्षणीं तुम्ही बाहेर पडा. महालाच्या मागें ऐरावत उभा असेल. पश्चिम दरवाजांत कोणी अडवणार नाहीं सरळ जंगलाचा रस्ता धरा."

आश्चर्यचकित होऊन शामकुवर ते ऐकत होती. ती कापऱ्या आवाजांत म्हणाली, "आणि तुम्ही ?"

'शक्यतों मी तुमच्या पाठोपाठ येईन पण माझी वाट पाहूं नका. मी गाठेन तुम्हांला.'

अभय वळला. शामकुवरनें हाक मारली, 'अभय ऽऽ' अभय थांबला. शामकुवरवर नजर स्थिर करीत तो म्हणाला, 'सांगितल्यांत चूक होऊं देऊं नका.'

नृत्य संपतांच बैठकीवर शामकुवर आली. तिनें बैठक घेतली. समशेरचा डोळ्यावर विश्वास बसत नव्हता. शामकुवर गात होती. स्वर्गीय आवाजानें महाल भरत होता. अभयनें मदिरेचा प्याला भरून समशेरच्या हातीं दिला. गाता गाता महालाबाहेरच्या शामदानीकडे शामकुवर पहात होती. समशेर बेहोष होत होता. अचानक शामदानी विझली. शामकुवरनें पाहिलें, कोणींच भानावर नव्हतें. ती गडबडीनें उठली आणि महालाबाहेर पडली. प्रासादाच्या मागे ऐरावत उभा होता. शामकुवरनें जवळ जाऊन खुणावतांच ऐरावतानें आपल्या सोंडेनें अलगद शामकुवरला पाठीवर ठेवलें. ऐरावत दक्षिण दरवाजानें बाहेर पडला.

अभयनें तळघराच्या दारापर्यंत आलेल्या वातीवर चमक झाडली. तटाला लावलेल्या शिडीवरून तट ओलांडला आणि तेथें उभ्या असलेल्या घोड्यावर तो स्वार झाला. धरणी दुभंगणारा आवाज उठला, एका पाठोपाठ आवाज उठत होते. समशेरच्या पापानी अपालेच झालेल्या संग्राम गढीच्या ठिकऱ्या आकाशांत उडत होत्या. बेसावध असलेल्या समशेरच्या तळावर चारीबाजूंनी तोफांची आग पाखडूं लागली. चांदण्याचा उजेड अग्निलोळांत दिसेनासा झाला. अचलेश्वराचे जंगलाला धक्के बसूं लागले.

क्षणभर तें दृष्य न्याहाळून अभयनें घोड्याला टांच दिली. बराच वेळ मजल केल्यावर त्याला ऐरावताचा आवाज ऐकूं आला. त्या आवाजाच्या रोखानें अभय जात होता. अभय चिंतातूर होता. ऐरावताशेजारीं उभ्या असलेल्या शामकुवरला पाहिलें तेव्हां अभयला बरें वाटलें. घोड्यावरून उडी टाकून तो शामकुवरकडे धांवला. शामकुवरचे दोन्ही खांदे धरून तिला न्याहाळत तो म्हणाला,

'त्रास झाला नाहीं ना?'

'अहं!'

शुभ्र चांदणें पडलें होतें. त्या चंद्रप्रकाशांत दोघे एकमेकांना निरखित होते. ऐरावत मान डोलावीत उभा होता. अचानक तो शामकुवरच्या मागे आला आणि त्यानें शामकुवरला आपल्या सोंडेनें धक्का दिला. तोल सावरीत शामकुवर किंचित् क्रोधानें म्हणाली,

हा ऐरावत. मी शामकुवर आहे, शामकुवर.

त्या शब्दाबरोबर ऐरावतानें शामकुवरला आपल्या सोंडेचा विळखा घातला आणि अलगद उचलून शामकुवरला आपल्या पाठीवर ठेवलें. काय होतें आहे हें कळण्याच्या आंत ऐरावत झपझप चालूं लागला. ऐरावताच्या मस्तकावर पडलेली शामकुवर ऐरावताला सांगत होती,

'असं काय करतो ऐरावत! अरे मी शामकुवर...'

पहाटेचा समय होत आला होता. अभय घोड्यावरून मागोमाग जात होता. उजाडूं लागलें आणि ऐरावत अचलेश्वराचे माथ्यावर येऊन उभा राहिला. ऐरावत बसतांच अभयनें घोडें नजीक आणलें व शामकुवरला उचलून घेतलें अभय व शामकुवर आश्चर्यचकीत नजरेनें ऐरावताकडे पहात होते. शामकुवर म्हणाली,

'ऐरावत कधीं असा वागला नव्हता.'

ऐरावत उभा राहिला. एका उंच वृक्षाखालीं असलेल्या शिळेला त्यानें मस्तक लावलें. अभय, शामकुवर आश्चर्यानें तें पहात होतें. शिळा हलतांच ऐरावतानें जोरानें आवाज दिला आणि तो उभा राहिला. कुतुहलानें दोघे पुढें झाले. शिळेच्या जागीं कुदळ—खोरें दिसत होतें. शामकुवर म्हणाली,

'बरोबर आहे. अभय ही जागा उकरा. समशेरच्या स्वारी आधीं एकेराची बाबा ऐरावताला घेऊन बाहेर पडले होते. बहुतेक परवलीचा शब्द शामकुवरच सांगितला असावा.'

'कसला परवलीचा शब्द?' अभयनें विचारलें.

'कुमार, ही जुनी परंपरा आहे. परचक्र आलें असें वाटलें कीं राजेलोक हत्तीवर जवाहीर लादून एकांताच्या जागीं जातात. तिथें द्रव्य पुरतात आणि हत्तीला कोसंब्याचा रस पाजून परवलीचा शब्द सांगतात. हत्तीचं स्मरण मोठं. तो लक्षांत ठेवतो. मृत्यूपूर्वी राजा परवलीचा शब्द आपल्या मुलाला सांगतो. अशा तऱ्हेनें धन सुखरूप रहातें.

'तरीच', अभय म्हणाला, 'तुला आठवतं संगाचाचा शेवटीं काय म्हणाले तें? शामकुवर—लक्षांत ठेव...शामकुवर. त्यांना हेंच सांगायचं असेल.'

अभयनें दोन्ही संदूका बाहेर काढल्या. शामकुवर म्हणाली, 'ह्याचं काय करायचं?'

'तो प्रश्न आपला आहे. धन आपलं आहे. जशी आपली इच्छा असेल तसं होईल.' अभय म्हणाला.

'शामवकुर कळवळून म्हणाली, 'असं का बोलता, शामकुवर कां नाहीं म्हटलंत?'

'तो अधिकार माझा नाहीं.'

'कुमार!'

अभय नजीक गेला. शामकुवरच्या व्यथित नजरेला नजर देत त्यानें विचारलें, 'खरंच माझा अधिकार आहे का?'

शामकुवर लाजली. अभय हंसून म्हणाला, 'आज कुसुंब्याचा रस हवा होता.'

'का?'

'माझं धन ज्या जागीं सापडलं त्या जागेची आठवण ऐरावताला ठेवायला लावली असती. चल आपल्या राज्यांत जाऊं.

'कुठें!'

'मुलीला पतीचं घरच आपलं असतं. माझ्या पिताजींना सून जरूर आवडेल. कारण ती त्यांच्या मित्राची मुलगी आहे ना?'

म्हातारा थांबला. म्हणाला, 'संपली गोष्ट. चला उशीर होईल आपल्याला.'

मी उठलो. कँपच्या वाटेला म्हाताऱ्यानं आणून सोडलें.

तेथून कँप दिसत होता. मी म्हणालो,

'तुम्ही गेलात तरी चालेल. जाईन मी.'

म्हातारा वळला. मी हांक मारली व म्हणालो, 'आपलं नांव नाहीं समजलं.'

म्हातारा हंसला व म्हणाला, 'सारे दरबार म्हणतात मला. संग्रामगढीजवळच रहातो मी. कुणालाही विचारलंत तरी सांगेल. वाट चुकलात तर जरूर या.'

मी कँपवर गेलों. चालण्याच्या श्रमानें पाय दुखत होते. मी झोंपी गेलों. दुसऱ्या दिवशीं नोकर घेऊन मी जंगलांत फिरायला गेलों. जंगलांतून फिरत असतां एकदम मला आठवलं. मी नोकराला विचारलं,

'अरे दरबार तुला ठाऊक आहे?'

'जी हुजूर! जवळच आहे, जायचं?'

'हो.'

नोकरापाठोपाठ मी जात होतों. संग्रामगढीची वास्तू ओलांडून मी पुढें गेलो. जंगलांत एके ठिकाणीं नोकर थांबला. मी विचारले.

'कुठें आहे दरबार?'

'तो काय' म्हणत नोकरानें बोट दाखविलें. माझं लक्ष तिकडं गेलं. तेथं संगमरवरी टुमदार समाधि उभी होती. मी उद्गारलो. 'हा दरबार!'

'जी हुजूर! दरबार म्हणजे राजा. ही समाधि त्याच नांवानें ओळखली जाते. संग्रामसिंगाची ही समाधी आहे असं म्हणतात.

●●●





अनुक्रमणिका




## गोमंतकाचे दुर्दिन सरोत ! —सारस्वत

१९ डिसेंबर १९६१ रोजीं गोमंतक स्वतंत्र भारतांत विलीन झाला. साडेचारशें वर्षांची जुलमी राजवट संपुष्टांत आली. दोन्हीं बाहू उभारून आबाल-वृद्ध गोमंतकीयांनीं स्वातंत्र्यसूर्याचें स्वागत केलें. जवळ जवळ पस्तीस दिवस आणि पस्तीस रात्रीं आम गोमंतकीय जनता एका धुंद वातावरणांत न्हाली. स्वातंत्र्याचा आनंद त्यांनीं स्वर्गसुखासारखा मानला. आणि भावी उर्जित कालाचीं स्वप्नें पहात ते वाट चालूं लागले.

वास्तविक संक्रमणकालांत जें अराजक माजतें त्याची झळ स्वातंत्र्यानंतर ताबडतोब गोमंतकाला लागलेलीच होती. खेडोपाडीं लुटालूट चालू होती. तक्रारींना दाद मिळत नव्हती. जिकडे तिकडे मोंगलाईसारखा कारभार चालू झालेला होता. घरचे भेदी आणि बाहेरचे चोर मिळून बायकांच्या गळ्यांतलीं मंगळसूत्रेंसुद्धां ओढून घेऊन भ्रष्टाकार करण्यापर्यंत मजली गेल्या होत्या. कांहीं गोष्टी लष्कराच्या माथीं मारण्यांत आल्या. कांहींच्या तक्रारींची दखल घेतली गेलीच नाहीं. नॅशनल काँग्रेसचे लोक एक सांगत, गोवा लोकशाही पक्ष दुसरा मार्ग सुचवी आणि पुढाऱ्यांचीं सोंगें घेतलेले उपटसुंभ लोक वेगळीच दिशाभूल करीत; परंतु अशा या परिस्थितींत देखील आज नाहीं उद्यां हें सर्व निवळेल, संक्रमण कालांत असें हें होतेंच— या भावनेनें सुशिक्षित समाज स्वातंत्र्यसूर्याला अर्घ्य देत स्वस्थ राहिला; पण दिवसांमागून दिवस गेले. महिने संपले आणि एक वर्षहि लोटलें, तरी अजून गोमंतकांतला अंतर्गत राजकारभार जिथें सुधारलेला नाहीं तिथें अन्य सुधारणांची काय अपेक्षा करावी ?

वशिलेबाजी, लांचखाऊवृत्ति, बळजबरी, बेपर्वाई इत्यादी दुर्दशांच्या स्वातंत्र्यानंतर नाश होईल असें प्रत्येक गोमंतकीयाला वाटत होतें. कुणीं यावर आक्षेप घेतला तर जाणते लोक म्हणत भारतीय शासनकर्त्यांना चौदा वर्षांचा दीर्घकालीन अनुभव आहे. एवढयाशा या प्रदेशाची ते दोन महिन्यांत सुधारणा करतील; जिकडे तिकडे आबादी आबाद होईल; परंतु कसचें काय आणि कसचें काय ! जो जो अधिकारी तिथें गेला त्यानें त्यानें स्वतःची तुंबडी भरून घेण्याखेरीज दुसरें कांहीं केलेंच नाहीं. या अधिकाऱ्यांनीं 'टाइपरायटर्स' पासून कचेरींतल्या टेबलें–खुर्च्यांपर्यंत जी लूट केली तिची यादी गोमंतकांतल्या सरकारी नोकरांकडे आहे; पण या गोष्टींची वरिष्ठ खात्यानें–तक्रारी केल्या असतांहि–चौकशीहि केली नाहीं.

लष्करी राजवटींतले प्रमुख जनरल के. पी. कँडेथ यांनीं निदान तीन मोठे पूल थोड्याच अवधींत दुरुस्त करून घेतले. कांहीं साकव बांधून घेतले. लोकांना दिलासा दिला; पण ती राजवट संपुष्टांत आल्यानंतर आलेले गव्हर्नर श्री. शिवशंकर यांनीं आपल्या कारकिर्दींत कांहीं देखील केलेलें नाहीं. ते शिंक आली तरी दिल्लीला धांवतात. गोव्यांत मुलकी कारभार सुरू झाला तेव्हांपासून सर्व सरकारी कचेऱ्या आणि तेथील एकंदर राजवटीलाचा एकप्रकारचा सुस्तपणा आला. आयात–निर्यात, न्यायदान, प्रांतिक व्यापार, शिक्षण–पद्धति इत्यादि क्षेत्रांत सांवळागोंधळ चालू असून दिवसेंदिवस सरकारविषयीं वाढता असंतोष सर्व गोमांतकीय जनतेंत दिसून येत आहे. आधींचें सरकार बरें होतें असा समज बळावत आहे.

या सर्वांवर कळस म्हणून नॅशनल काँग्रेस गोवा या संस्थेतले कांहीं लोक आल्या संधीचा फायदा घेऊन खेड्या–पाड्यांतल्या अशिक्षित जनतेची दिशाभूल करीत आहेत. आणि आपला स्वार्थ साधून घेत आहेत. त्यांच्याबद्दलच्या कागाळ्यांना सरकारकडून उत्तर नाहीं. कोंकणी–मराठीवाद, ब्राह्मण–ब्राह्मणेतर वाद असे वाद पेट घेऊं लागले असून त्यांचा केव्हां स्फोट होईल हेंहि सांगतां येत नाहीं. अशा अनेक संकटांमुळें गोमंतकीय जनता सध्यां हवालदील झालेली आहे. गोमंतकाचे हे दुर्दिन सरोत आणि तिथें सुराज्य नांदो अशी या वेळीं तिथल्या सर्व देवांना स्मरून आम्हीं प्रार्थना करतों !

## 'जाग' आणणारा प्रयोग —रसिक मनोहर

एक थोर पिता आणि त्याचा थोर पुत्र यांचे वैयक्तिक संबंध–राजा व राजपुत्र या नात्यापक्षांही पिता आणि पुत्र म्हणून–हाच मध्यवर्ती विषय असलेलं, शिवाजी व संभाजी या पितापुत्रांच्या बदलत्या संबंधाच्या संदर्भांत नाट्यपूर्ण संघर्षावर आधारलेलं आगळं नाटक म्हणजे 'रायगडाला जेव्हां जाग येते' ! हे !

तसं पाहिलं तर ह्या नाटकाला ऐतिहासिक पार्श्वभूमी आहे म्हणून त्याकडे इतर ऐतिहासिक नाटकाच्या दृष्टीनें पहाणें रास्त ठरणार नाहीं. ह्या नाटकांत दाखविलेला मनोविश्लेषणात्मक संघर्ष ह्या कुठल्याहि सामाजिक नाटकांत चपखल बसणारा आहे. घराबाहेरच्या जगांत राजकीय, सामाजिक वा शैक्षणिक जगांत रात्रंदिन खपून मानमान्यता, प्रतिष्ठा मिळविणाऱ्यांच्या घरांत सुद्धां हाच संघर्ष कमीअधिक प्रमाणांत आढळावा. तिथेंही घरांतील प्रमुख कर्ता व्यक्ति व इतर आप्तजन ह्यांच्यामध्यें मनःसंवाद होऊं न शकल्याचीं उदाहरणं, घरच्या व्यक्तींपेक्षांही दारच्या गोष्टींबद्दलच्या प्रमुख व्यक्तीची ओढ, तळमळीबद्दलच्या तक्रारी कांहीं कमी आढळायच्या नाहींत. म्हणूनच ह्या नाटकांतला संघर्ष हा कालातीत आहे. असलं नाटक एखाद्या ऐतिहासिक नाटकासारखं ठोकळेबाज ढोबळपणानें बसवण्यांत धोका असतो. हें नाटक बसवितांना प्रथम जाग आली पाहिजे ती ह्या गोष्टीची कीं त्यातील वेदना प्रेक्षकांपर्यंत समर्थपणें पोंचविण्याची !

प्रस्तुत नाटकाचं प्रमुख सामर्थ्य म्हणजे सुंदर व संपन्न भाषाशैली. नुसत्या शब्दांतून दिव्य नि भव्य आशय आणि समर्थ व्यक्तिरेखा साकार झालेल्या आहेत. काव्यमय व नादवती





अनुक्रमणिका

भाषा मनावर विलक्षण परिणाम करून जाते, इतका कीं ह्या नाटकांतील इतर उणीवा ध्यानांत यायला अवधींच सांपडूं नये. त्यामुळें सबंध प्रयोग चांगला झाला अशी सामान्य प्रेक्षकांची समजूत होते–किंबहुना बऱ्याच वर्षांनीं एक चांगलं नाटक पाहिलं अशी ग्वाही देऊन तो मोकळा होतो ! परंतु रसिक व चोखंदळ प्रेक्षकाच्या मनांत नाटक संपल्यावर प्रामुख्यानें कोणता विचार येत असेल तर तो हाच कीं, आकाशवाणीवर हेंच नाटक ऐकायला किती प्रभावी वाटेल. !

हें असं कां व्हावं ? गेल्या दोन–तीन वर्षांत गोवा हिंदु ॲसोसिएशननें सादर केलेल्या नाट्यप्रयोगांनीं एक गोष्ट निर्विवादपणें स्पष्ट केली; आणि ती म्हणजे नाटक आणि त्याचा दिग्दर्शक ह्यांचे ग्रह कधींच जमले नाहींत. नाटक एका जातीचें तर दिग्दर्शक दुसऱ्या प्रकृतीचे असाच अनुभव आला ! प्रस्तुत नाटक बसवितांना सुद्धां नाटकाची जात लक्षांत न घेतल्यामुळें एका सुंदर व संपन्न नाट्यवस्तूवर अन्याय झाल्यासारखें वाटलें. मास्टर दत्ताराम यांनीं हें नाटक परिश्रमानें व कसोशीनें बसविलें आहे यांत शंकाच नाहीं. पात्रांनी शब्दन् शब्द ( पाठांतरांमुळें ) प्रेक्षकांपर्यंत पोंचविला; पण त्यांतली वेदना तीव्रपणें जाणवली नाहीं. एका जिवंत व सकस नाट्यवस्तूच्या रंगमंचांवरील आविष्काराला, एका समर्थ आशयाच्या अभिव्यंक्तीला दत्तारामांचं कसब अपुरं पडलं.

गोवा हिंदु असोसिएशनॅन हें नाटक नेटकेपणानें सादर केलें. नाटक चांगलें आहे हा बहुसंख्य प्रेक्षकांनीं दिलेला कौल हेंच संस्थेच यश; परंतु याहून निश्चित वरच्या वरच्या दर्जाची कलाकृति सादर करण्याची आलेली दुर्मिळ संधी हुकली हें अपयश–विशेषतः 'साहेबांच्या ' समस्या दत्तक घेऊन त्या मराठी भाषेंत रंगविण्याच्या ( त्यांतील कांहींची भाषाहि धड मराठी नसते ! ) आणि चांगल्या 'घरेलु' नाटकांच्या दुर्भिक्षतेच्या या दिवसांत ! !

अभिनयाच्या दृष्टीनें लक्षांत राहिले ते मा. दत्ताराम व कुमार शिरीष कुलकर्णी ! मा. दत्ताराम यांनीं आपली नेहेमीची राणाभीमदेवी पठडी कटाक्षानें बाजूला टाकून कानिटकरांनी रेखाटलेलीं शिवाजीचीं विविध रूपें प्रेक्षकांपुढें बऱ्याच अंशीं यशस्वीपणें उभीं केलीं. राजा व पिता हीं या स्वभावाचित्रांचीं महत्वाचीं अंगें, बारकाईनें साकार केलीं; पण इथेंहि अभिनयापेक्षां त्यांच्या अकृत्रिम शब्दोच्चारांनी व आवाजाच्या चढउताराच्या सराईत कसबानेंच ज्यास्त मदत केली. ( राज्य–नाट्य स्पर्धेंत प्रथम क्रमाकांचं बक्षीस पहिल्याच सलामींत मिळवून, संस्थेचा बोलबाला करणाऱ्या 'लडाष्टक' नाटकाचं दिग्दर्शन होतं मा. दत्ताराम यांचंच. त्यानंतर त्यांच्या संस्थेशीं संबंध आला तो या नाटकाच्या निमित्तानें. सस्थेबद्दल नाटय रसिकांच्या अपेक्षा निश्चितपणें उंचावणाऱ्या, एका वेगळ्या धर्तीच्या मनोविश्लेषणात्मक ऐतिहासिक नाटकाचं दिग्दर्शनहि मा. दत्ताराम यांचं आहे, हा योगायोगहि कौतुकाचाच ! ) शिरीष कुळकर्णी ह्या गोड चेहेऱ्याच्या आणि पाणीदार डोळ्याच्या मुलानें राजारामाचें काम विलक्षण आत्मविश्वासपूर्वक केलें. महाराजांचे अखेरचे शब्द शंभूराजांच्या कानीं घालण्याचा नाटकांतील उत्कट उत्कर्ष बिंदू या बाल–नटानें समर्थपणें पेलून धरला ! •••

---

पान ५३ वरून

अपरिचित वाटला. त्यांतील कोड लॅंग्वेज त्यांची नव्हती. आवाज परिचित असावा असें वाटे. एवढ्या धीराचे भोंसलें ते सुद्धां क्षणभर विचलित झाले. कोणी दगाबाजी केली नसेल ना, त्यांना संशय आला. तसं जर झालं तर बटालियनमधील एकूण एक माणसांचें जिवित धोक्यांत होतें. मेजर देशपांड्यांचा जीव धोक्यांत होता. कर्नलांना बसवेना. सुभेदार शिंद्यांना सेटवर बसवून ते छावणीवर परतले. रिटा कामांत दंग होती !

कर्नलांना परत बोलवणं आलं. चिनी लोकांना ब्रह्मी स्त्रियांच्या वेषांत हेरगिरी करतांना तवांगमध्यें पकडण्यांत आलें होतें. पण त्यांची ही धोकेबाजी पकडण्यांत आली होती. कर्नलांना वाटलें तो लो फ्रिक्वेन्सीवरचा कॉल, ते कोडं हे संर्व या हेरांचेच काम असावें ! छावणीवर परतले तेव्हां रिटा जखमी जवानांना पाहण्यास गेली होती. ती परतल्यावर भोंसल्यानीं तिला तो अपरिचित कॉल व तवांगमध्यें चाललेली हेरगिरी वगैरे गोष्टी सांगितल्या. ते म्हणाले, ' या हेरांनीं जर आपल्या जवानांची बातमी त्यांना कळविली असेल तर आपल्या बटालियनपैकीं एकहि सैनिक जिवंत परतणार नाहीं रिटा ! '

'युद्धामध्यें या गोष्टी नेहमीं चालतात तेव्हां आपणच जागरूक राहिलं पाहिजे,' रिटा म्हणाली.

आज चिन्यांनीं मजल मारली होती. बहुतेक जवान कामास आले होते. मेजर देशपांडे ठार झाले होते ! दौलतबेग चिन्यांनी काबीज केलें होतें !

यानंतर सतत पांच–सहा दिवस चिनीच मजल मारीत होते. जवानांच्या रक्ताचा सडा पडत होता. पळून आलेला एखादा दुसरा जवान बातमी देत होता. जवानांनीं हालचाल करण्यापूर्वींच चिनी चारी बाजूंनीं हल्ला करीत होते. जवानांचा गनिमी कावा शत्रूंना अगोदरच कुणी कळविला असावा !

लो फ्रिक्वेन्सीवरील त्याच परिचित आवाजांतील कॉल ऐकूं येई ! पण अजून कोशीश करूनहि शोध लागत नव्हता ! शत्रू सुन्नानसिरी, चुशूलपर्यंत आले होते. कर्नल हताश झाले होते. देशद्रोह्याचं रक्त सांडायला ते आसुसले होते. रेनफोर्समेंट हवी तितकी येत होती. पण धोकेबाज चिन्यांच्या अत्याचाराचा वचपा काढायला जमत नव्हतं. जवान धोकेबाजीमुळें धारातीर्थी पडत होते म्हणून कर्नलांना दुःख होत होतं. सह्याद्रीच्या काळ्या पथ्थरासारखी त्यांची निबडी छाती निराशेनें खचून गेली होती.

आज स्वतः आघाडीवर जायचें असा त्यांनीं निश्चय केला. कारण चार दिवसांत येथें भगिरथ प्रयत्न करूनहि त्यांना यश नव्हतं मिळत. निदान आघाडी तरी सांभाळण्याचा प्रयत्न करावा असा त्यांनीं विचार केला. जनरलांकडे सेटचा ताबा देऊन कर्नल भोंसले, कॅप्टन काणे व मेजर गुप्तांना घेऊन छावणीवर आले. आंत पाऊल ठेवताहेत तो त्यांना तीच कोड लॅंग्वेज तोच परिचित आवाज जवळून ऐकूं आला. रिटा कॉल करीत होती ! भोंसल्यांच्या डोक्यांत झिणझिण्या उठल्या ! त्यांचं काळीज सात्त्विक संतापानें पेटलं. गुप्ता हतबुद्ध झाले !

' फायर ! ' कर्नलांनीं ऑर्डर सोडली. कॅप्टन काणे अगतिकपणें उभें राहिले ! खिशांतील पिस्तुल काढून भोंसल्यांनीं रिटाच्या धोकेबाज काळजाच्या चिंधड्या उडविल्या ! ! प्राणापेक्षां प्रिय पत्नीचे धोकेबाज प्राण हरण करून तो ध्येयनिष्ठ, स्वदेशाभिमानी भारतीय जवान मोठ्या धैर्यानें आपल्यां मातेचें स्वातंत्र्य राखण्यास निघाला ! ! !

•••








# आयुर्विमा त्यांना साहाय्य करतो... ज्यांचें तुम्ही रक्षण करतां...





# जे तुमचें रक्षण करतात

ज्यावेळीं तुम्ही आयुर्विमा घेतां त्यावेळीं तुमच्या कुटुंबाला आणि देशाला साहाय्य करीत असतां. घरांतल्या कर्त्या पुरुषाच्या आकस्मित निधनानंतर त्याच्यावर अवलंबून असणाऱ्या त्याच्या कुटुंबियांना आयुर्विमाच आधार देत असतो, त्यांचें संरक्षण करीत असतो. याशिवाय, आयुर्विमा कॉर्पोरेशनच्या निधींतला मोठ्यांतला मोठा भाग राष्ट्रीय संरक्षण कार्यांत सतत गुंतविला जात आहे. म्हणूनच आयुर्विम्याच्या दोन संरक्षक हातांमध्यें तुमचा पैसा पडूं द्या.

> आयुर्विमा कॉर्पोरेशननें राष्ट्रीय संरक्षण रोख्यांत प्रारंभ म्हणून ५ कोट रुपये गुंतविले आहेत. आयुर्विम्यांत गुंतविण्यांत आलेल्या तुमच्या बचतीचा इतका सार्थ उपयोग याहून दुसरा कोणता असूं शकेल?

**लाइफ इन्शुअरन्स कॉर्पोरेशन ऑफ इन्डिया**



अनुक्रमणिका




बस्तीराम नारायणदास महेश्री आणि चांडक ब्रदर्स, सिन्नर (नाशिक)